# नवभारत

वर्ष ४ थें ]  डिसेंबर १९५०  [ अंक ३ रा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






वर्ष चौथें
अंक ३ रा

नवभारत

१९५०

# या अंकांतील जाहिराती












आ म चें नवें प्र का श न

# सर्वोदय-योजना

सर्वोदय-नियोजन-समितीनें प्रकाशित केलेल्या 'सर्वोदय-योजने'ची रूपरेखा प्रस्तुत पुस्तिकेंत देण्यांत आली असल्यामुळें 'नवसमाज-निर्मिती'चें ध्येय बाळगणाऱ्या कार्यकर्त्यांना ती अत्यंत उपयुक्त झाली आहे.

मूल्य बारा आणे

सु ल भ रा ष्ट्री य ग्रं थ मा ला, पुणें २

## वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत'च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत',
टिळक रोड, पुणें २

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष चौथें | नवभारत | डिसेंबर
अंक तिसरा | | १९५०

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

# ' नवभारत ', डिसेंबर १९५०

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षीं यापूर्वीं आले असून त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**प्रा. प. ि. पटवर्धन**—पुणें येथील नौ. वाडिआ कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. वसंत वरखेडकर**, एम्. ए.—नागपूर येथील " भवितव्य " या साप्ताहिकाचे कार्यकारी संपादक. " संक्रमण " ही कादंबरी आणि " ध्येयाचा ध्यास " व " पूर्वग्रह " हीं नाटकें या पुस्तकांचे लेखक.

**प्रा. स. वा. कोगेकर**—पुणें विद्यापीठांत राज्यशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. देवदत्त अ. दाभोलकर**—पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. म. शं. जावडेकर**—पुणें येथील ' बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कामर्स 'मध्यें प्राध्यापक. यांच्या " घरगुती उद्योगधंद्यांचें अर्थशास्त्र " या पुस्तकास दक्षिण महाराष्ट्र साहित्यसमिति या संस्थेनें १९४६ चें ४०० रु. चें " ओगले प्राइझ " दिलें.

**प्रा. म. गो. भाटे**—पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. " Literature And Literary Criticism " या पुस्तकाचे लेखक.

**डॉ. वि. ना. ढवळे**, एम्. ए., डी. फिल्. ( ऑक्स्फर्ड )—पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

**प्रा. नी. र. वऱ्हाडपांडे**, एम्. ए., बी. लिट्. ( ऑक्सफर्ड )—दिल्ली येथें ' संरक्षणविषयक वैज्ञानिक संघटने 'च्या ' मानसशास्त्रीय संशोधनशाखे 'मध्यें प्रमुख मानसशास्त्रज्ञ. ( Senior Psychologist ). " कूजन ", " सुखदुःखविवेक " इत्यादि पुस्तकांचे लेखक.

---

अनुक्रमणिका

श्री. दि. के. बेडेकर

# रससिद्धान्ताचें स्वरूप : ( २ ) देवासुरद्वंद्वाचें नाट्य

'नवभारत' च्या मागील म्हणजे नोव्हेंबर १९५० च्या अंकांत भरतमुनींनीं निरूपिलेल्या रस-व्यवस्थेची पार्श्वभूमि मीं मांडली आहे. त्या लेखांत भरतमुनींच्या 'वागंगसत्त्वोपेतान् काव्यार्थान् भावयन्ति इति भावाः' या सुप्रसिद्ध सूत्रांतील 'भाव' आणि 'काव्यार्थ' या शब्दांचे अर्थ भरतकालीन भारतीय विचारप्रवाहाच्या संदर्भांत निश्चित करण्याचा मीं प्रयत्न केला आहे.

## 'भावां'चा सामान्य गुण कोणता ?

काव्यार्थांना भावित करणारे हे नाट्यभाव 'लोक-प्रसिद्ध', 'लोकस्वभावसंसिद्ध' किंवा 'लोक-यात्रानुयायी' नाहींत, ही गोष्ट भरतांनीं स्पष्ट केली असल्याचें मीं मागेंच सांगितलें आहे. मग या पदार्थांचें स्वरूप व कार्य काय ? तर भरत म्हणतात त्याप्रमाणें 'एभ्यश्च सामान्यगुणयोगेन रसा निष्पद्यन्ते'. 'भावा'चे हे सामान्य गुण कोणते ?

या प्रश्नाचें उत्तर नुसत्या नाट्यशास्त्राच्या चौकटींत सांपडणार नाहीं, कारण भरतांनींच असें निर्देशिलें आहे कीं, भावांचा गुण अमुक आहे हें सांगण्याची जरूर नाहीं; कारण तो सामान्यच आहे. सामान्य म्हणजे नाट्यभावांप्रमाणें इतर क्षेत्रांतील 'भावां'तहि सामान्यतः नेहमीं आढळणारा. भारतीय तत्त्वज्ञानांत भाव, गुण, कर्म इत्यादि संज्ञांना सर्वगामी स्वरूप आहेच, हें लक्षांत घेऊन हा सामान्यगुण आकलन केला पाहिजे.

'भावां'चा सामान्यगुण चक्रपाणि या चरक-संहितेवरील प्रसिद्ध टीकाकारानें सूत्ररूपानें दिला आहे. तो असा: 'शक्तिर्हि स्वरूपमेव भावानाम्, नातिरिक्तम् किंचित् धर्मांतरम् भावानाम्' ( प्रा. दासगुप्त, 'हिस्टरी ऑफ इंडिअन फिलॉसफी' भाग २, पान ३६३ ). शक्ति हा 'भावां'चा धर्मच आहे ही गोष्ट नाट्यवेदांतहि भरतांनीं गृहीत धरली आहे. नुसते नाट्यधर्मी काव्यार्थ हे पंगु आहेत, पण एकदां रत्यादि 'भाव' उत्पन्न झाले, कीं नाट्यांत शक्ति संचरते; कारण 'भाव' हे शक्तिरूपच आहेत. हाच सामान्यगुणयोग भरतांनीं मानलेला आपल्याला आढळतो.

हीच भावांच्या शक्तिरूपाची कल्पना त्यांच्या पुढील श्लोकांत आली आहे :

योऽर्थो हृदयसंवादी तस्य भावो रसोद्भवः
शरीरं व्याप्यते तेन शुष्कं काष्ठमिवाग्निना ॥

( नाट्यशास्त्र, पा. ८० )

जो अर्थ म्हणून असतो तो हृदयसंवादी असतोच व त्याला भावित करणारा 'भाव' उत्पन्न झाला कीं नट, कवि, प्रेक्षक यांच्या एकत्वानें सिद्ध झालेलें जें नाट्य, त्याचें शरीरच व्यापणारा रसोद्भव होतो. कारण 'भावा' मध्यें अग्नि किंवा वायू यांच्याप्रमाणें एक अनुप्रवेशाची प्रबळ शक्ति आहे.

## 'भावां'चा पसारा

काव्यार्थांचा पराधीनपणा व पंगूपणा जाऊन नाट्य जर प्रभावी व्हावयाचें असेल तर, नाट्यांत शक्तिसंचार व्हावयाला हवा व तो 'भावां'च्या सामान्य गुणयोगानें होतो, ही सिद्धान्तांची इमारत ठीक झाली. पण इतर भारतीय विद्यांप्रमाणें नाट्य-विद्येंतहि असा प्रकार आढळतो कीं, ती विद्या








प्रत्यक्षानुगामी तर असते, पण दुसरीकडे परंपरागत चाकोरींतूनच तिची गति राहते. सिद्धान्त किंवा शास्त्र हें प्रत्यक्ष व परंपरा यांच्या अशा मिश्रणानें बनतें, यांत नवल कांहीं नाहीं. कारण मानवी मनानें व बुद्धीनें आजपर्यंत याच तऱ्हेनें शास्त्रज्ञानांत मजल मारली आहे. गृहीत वस्तू व गृहीत-सिद्धान्त आणि प्रत्यक्षाचें विश्लेषण व नवे विचार अशा संमिश्र पद्धतींतून, अडखळत व कष्टानेंच शास्त्रज्ञान वाढलें आहे. परंपरागत गृहीत सिद्धान्त प्रत्यक्ष अनुभवांना व निरीक्षणांना अपुरे व विरोधीदेखील ठरूं लागल्यावर ते टाकून नवे सिद्धान्त कल्पावयाचे, ते टाकाऊ ठरल्यावर पुन्हां नवे सिद्धान्त रचावयाचे, अशी ही अखंड ज्ञानक्रिया किंवा विकास प्रत्येक ज्ञानक्षेत्रांत आजवर चालू आहे. भरतमुनीसारख्या नाट्यशास्त्रज्ञानें नाट्यामधील मानसिक कल्लोळांचें निरीक्षण केलें नव्हतें, असें क्षणभरहि मानणें मूर्ख-पणाचें होईल. परंतु प्रत्यक्ष अनुभवाच्या कोऱ्या पाटीवर प्रतिभेनें एका सिद्धान्ताची हवाई हवेली उठवून देणें अशी किमया कोणताच शास्त्रज्ञ करीत नाहीं. कोरी पाटी अशी नसतेच व प्रत्येक शास्त्रज्ञाला पूर्वसूरी व गुरू असतात.

ही गोष्ट सांगण्याचें कारण व प्रयोजन काय? तर हें परंपरेचें लोण मानल्याशिवाय भरतांनीं एकंदर एकोणपन्नासच भाव कां मानले, त्यांतल्या आठां-नाच सात्त्विक कां म्हटलें व आठांनाच स्थायी भाव मानून त्यांना बाकीच्या एकेचाळिस भावांचें 'स्वामिभूत' भाव कां मानले, या तिन्ही प्रश्नांचीं योग्य उत्तरें देणें शक्य नाहीं. परंपरेचें हें ऋण भरतांनीं स्पष्टच मानलें आहे. ते म्हणतात : "रसानां भावानां च नाट्याश्रितानां चार्थानाम् आचारोत्पन्नानि आप्तोपदेशसिद्धानि नामानि भवन्ति।" (नाट्यशास्त्र, पान ७३). पण आमचे आधुनिक साहित्यशास्त्रज्ञ भरतांचें ऋण मानून ते फेडण्याच्या भरांत भरतांच्या परंपरेला व ऋणाला मात्र विसरतात व भरतांना स्वयंभू मानून आजच्या मानसशास्त्रीय वैयक्तिक भावनांचा ऊहापोह त्यांच्या पदरीं बांधतात!

### एकोणपन्नास भाव

वरील सर्व प्रश्नांचीं उत्तरें देण्यापूर्वीं या नाट्य-भावांची यादी मांडणें इष्ट होईल.

| रस | स्थायी भाव |
|---|---|
| शृंगार | रति |
| वीर | उत्साह |
| बीभत्स | जुगुप्सा |
| रौद्र | क्रोध |
| ... | ... |
| हास्य | हास |
| अद्‌भुत | विस्मय |
| करुण | शोक |
| भयानक | भय |
| ... | ... |
| (शान्त) | (शम) |

याशिवाय आठ सात्त्विक भावांपैकीं रोमांच, स्वरभेद व कम्प हे सर्वच भावांच्या बरोबर येऊं शकतात; स्तंभ हा सात्त्विक भाव भय आणि विस्मय यांच्याबरोबर राहूं शकेल; स्वेद, वैवर्ण्य, अश्रु आणि प्रलय (मूर्च्छा) हे सात्त्विक भाव मात्र भय, शोक इत्यादींबरोबरच राहूं शकतील.

आतां उरलेले तेहतीस व्यभिचारी भाव घेऊं. शारीरिक अवस्थांसारखे परंतु नाट्यधर्मी भावच असलेले मरण, व्याधि, इत्यादि कांहीं भाव या ३३ नाट्यभावांच्या यादींत आहेत. त्यांना खरोखरीच्या, म्हणजे लोकधर्मी, शारीरिक अवस्थाच समजणें चूक आहे, पण आधुनिक मराठी साहित्य-शास्त्रज्ञांनीं ही गफलत केली आहे ('रसविमर्श', पानें १२८ व १२९ पहा).

या ३३ व्यभिचारी नाट्यभावांचें कांहीं वर्गी-करण करणें शक्य आहे व त्यांत लोकधर्मी शारीरिक अवस्था, ज्ञानात्मक मनोऽवस्था आणि भावनात्मक मनोऽवस्था अशा आधुनिक वर्गीकरणाची मदत मीहि घेत आहे. परंतु, याचा अर्थ एवढाच कीं, 'भाव' या नाट्यधर्मी गृहीत पदार्थांचा लौकिक पदार्थांशीं जो केवळ समांतरपणा आहे, तो दिसावा.

तेहतीस व्यभिचारी भावांपैकीं पुढील भाव शारीरिक अवस्थांशीं समांतर आहेत : मरण,








## रससिद्धान्ताचें स्वरूप : (२) देवासुरद्वंद्वाचें नाट्य

व्याधि, ग्लानि, श्रम, आलस्य, निद्रा, स्वप्न (सुप्त !) अपस्मार, उन्माद, मद, मोह, जडता, चपलता (एकंदर १४).

पुढील भाव ज्ञानात्मक मनोऽवस्थांशीं समांतर आहेत : स्मृति, मति, वितर्क (एकंदर ३).

उरलेले १६ भाव भावनात्मक मनोऽवस्थांशीं समांतर आहेत : हर्ष, अमर्ष, धृति, उग्रता, आवेग, विषाद, निर्वेद, औत्सुक्य, चिंता, शंका, असूया, त्रास, गर्व, दैन्य, अवहित्थ, व्रीडा.

वरील यादीमध्यें शारीरिक, ज्ञानात्मक व भावनात्मक अशा बाबींची एकच खिचडी केली आहे असें मानून ती यादी 'अपुरी' व 'सदोष' आहे असा शेरा आधुनिक मराठी साहित्यकारांनीं व उत्तरकालीन संस्कृत टीकाकारांनींहि मारला आहे. पण या ३३ व्यभिचारी, ८ सात्त्विक आणि ८ स्थायी अशा या ४९ नाट्यभावांचा एकंदर सामान्यगुण कोणता, हें सूत्रच सुटल्यामुळें व गैरसमजामुळें ही टीका होत आली आहे. या भावांचा सामान्यगुण काव्यार्थांना 'भावित' करून शक्तिशाली करणें हा आहे. हे भाव शक्तिस्वरूपी आहेत. ते दुसऱ्या कोणत्या प्रभावी शक्तीचे परिणाम नाहींत; तर स्वतःच काव्यार्थांना प्रभावी करणारे आहेत.

नेमकी हीच गोष्ट भरतांच्या आधुनिक टीकाकारांनीं ओळखलेली नाहीं. त्यांनीं या भावांना परिणामस्वरूपी असे सर्व मानवजातीला समान असणारे शरीरधर्म व मूलभूत मनोविकार मानण्याचा प्रयत्न केला आहे (काव्यालोचन, पा. ८९ पहा). येथेंच सर्व विपर्यास झाला आहे. त्याचा विचार न करतां टीकेचा हा सारा प्रपंच कसा रचला गेला, हें एक मोठें नवल आहे. परंतु असें घडलें आहे खरें !

उदाहरणार्थ, मरण हा नाट्यभाव घ्या. आतां हें 'मरण' कोणचें ? कोणाचें ? अर्थात्, हें 'मरण' लोकधर्मी नसून नाट्यधर्मी आहे हें उघड आहे. रंगभूमीवर सिंधूच्या बाळाचा मृत्यु हा शोककारक व प्रभावी होतो. परंतु तो मृत्यु कांहीं कोणाची शारीरिक अवस्था नाहीं. तो एक नाट्यभाव आहे व नाट्यांत प्रभावी आहे. तो एका शरीरावस्थेशीं समांतर आहे एवढेंच.

तीच गोष्ट स्थायी नाट्यभावांच्या बाबतींतहि भयाचें उदाहरण घेऊन दाखवितां येईल. 'भय' हा स्थायी भाव म्हणजे रसिकाचा किंवा नटाचाहि मनोविकार नाहीं. तो एक नाट्यभाव आहे. नाट्यांतील दुष्यंताच्या बाणाला भिऊन प्राणभयानें पळणाऱ्या नाट्यमृगाचें 'नाट्यभय' हा तो नाट्यभाव आहे.

'भय' हा नाट्यभाव परिणामस्वरूपी मनोविकार नाहींच, पण उलट, स्वतःच काव्यार्थाला प्रभावी ('भावित') करणारा एक विलक्षण (अर्थात् गृहीत) पदार्थ आहे.

### भावांची सार्वत्रिकता व प्राथमिकता

नाट्यभावांना नाट्याचे रसिकमनावरचे वास्तवधर्मी परिणाम मानण्याची गफलत झाल्यामुळें मग या नाट्यभावांची सार्वत्रिकता, प्राथमिकता व स्वयंसिद्धता वगैरे तपासण्याची कल्पना निघाली. हा प्रयत्न आधुनिक मराठी साहित्यशास्त्रज्ञांनीं केला व त्यांना आढळून आलें कीं, मानवी मनोविकारांपैकीं सार्वत्रिक, प्राथमिक किंवा स्वयंसिद्ध अशाच केवळ भावनांचा समावेश नाट्यभावांत आहे असें नाहीं; तसेंच प्राथमिक अशा सर्वच भावना 'भाव'-व्यवस्थेंत आढळत नाहींत. श्री. श्री. नी. चाफेकर, डॉ. वाटवे व श्री. जोग यांच्याकडून हा प्रश्न खूपच चर्चिला गेला आहे. त्या सर्व चर्चेचा निष्कर्ष काय ? तर शृंगार, करुण, बीभत्स या रसांच्या स्थायी भावांबद्दल व त्या रसांबद्दल या शास्त्रज्ञांना असें वाटतांना दिसतें कीं, आधुनिक मानसशास्त्राच्या दृष्टीनें भरतांचें बरेंच चुकत आहे ! मग पुढें जाऊन कोणी शांत, वत्सल वगैरेंची भर टाकण्याचें सुचवितात. कोणी आस्वाद्यमानतेवर भर देऊन नाट्यभावांची तीच एक कसोटी मानूं लागतात ! पण त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट अशी कीं, भरतांच्या 'रसभावविकल्पना'ला मानसशास्त्रीय चौकटींत अशा तऱ्हेनें बसविण्याच्या या प्रयत्नांत अपयशच आलेलें सर्वजण प्रांजलपणें कबूल करतात ! तरी दुर्दैवानें पुन्हां असें मात्र ते मानीतच राहतात










कीं, ' भाव ' हे मानवी मनाचे मूलभूत मनोविकार आहेत !

### भावांचा मनोविकारांशीं संबंध

आधुनिक टीकाकारांप्रमाणेंच उत्तरकालीन संस्कृत टीकाकारहि भरतांच्या रसभावव्यवस्थेबद्दल कांहीं तरी संस्करणाची व ओढाताणीची भूमिका घेत बसले किंवा कांहींजण जगन्नाथांप्रमाणें ' मुनि-वचन—आदरा 'चें तत्त्व पुरस्कारून रसभावादिकांच्या भरतप्रणीत संख्येची व नांवांची नुसती तरफदारी करीत राहिले.

असें होण्याचें कारण हें कीं, ' रस ' व 'भाव' हे मनोविकार नाहींत हें जसें खरें, तसेंच कांहीं मर्यादित व ठराविक मनोविकारांशीं ते समांतर आहेत हेंहि खरें. गफलतीचें हेंच मूळ कारण आहे. कोणत्या मनोविकारांशीं नाट्यधर्मी रसभाव समांतर आहेत तें उघड दिसत आहे. तेव्हां, माझ्या मतें भरतप्रणीत रसभावव्यवस्थेबद्दल एवढाच प्रश्न खरा उरतो कीं, अमुकच मनोविकारांशीं समांतर असें रसभावविकल्पन भरतांनीं केलें याचें कारण काय ? नाट्य हेंच मुळांत आस्वाद्य आहे, आनंददायी आहे, वगैरे गोष्टी निर्विवादच आहेत. प्रश्न एवढाच कीं नाट्यशास्त्र रचतांना भरतांना नाट्याचें असें कोणतें विशिष्ट स्वरूप अभिप्रेत होतें कीं, ज्यामुळें त्यांना अमूकच आठ रसभाव हे मूलभूत ठरविण्याची बुद्धि झाली ?

वरील प्रश्नांचीं उत्तरें शोधण्याचा प्रयत्न उत्तर-कालीन संस्कृत साहित्यिकांनीं केलेला दिसत नाहीं. आधुनिकांनीं तर नाहींच. जर हा प्रयत्न कोणी केला असता तर ' रस ' आणि ' भाव ' यांचें स्वरूपहि त्याला स्पष्ट झालें असतें व भरतांची ' अपुरी व सदोष ' व्यवस्था सुधारून वाढवीत बसण्याच्या प्रयत्नांतील वैयर्थ्य व दांडगाई त्याच्या लक्षांत आली असती. उत्तरकालीन संस्कृत साहित्य-शास्त्री व आधुनिक चिकित्सक या बाबतींत बिनचूक दिशेनें संशोधन करूं शकले नाहींत खरें. असें कां व्हावें हा प्रश्न महत्त्वाचा असला तरी, प्रस्तुत निबंधाच्या कक्षेबाहेरचा आहे.

### भारतीय कलांचा ' अनामिकपणा '

मानवी मनोविकार, त्यांतूनहि व्यक्तिमनांचे विकार, हे आज कलास्वरूपशास्त्रांत आधारभूमि म्हणून धरले जातात. त्यांतूनहि व्यक्तिमनांचे सामान्य व मूलभूत विकार हा आजच्या कलेंतील मुख्य विषय व आशय नसतो; तर अमुक एका व्यक्तीचें मन व त्याचें रेखाटन किंवा दर्शन हें आधुनिक कलेचें उद्दिष्ट असतें. उदाहरणार्थ, सुधाकराचे मनोविकार गडकऱ्यांनीं चित्रित केले आहेत, किंवा हॅम्लेटचे विकार शेक्स्पियरनें वर्णिले आहेत. आधुनिक नाट्यांमधील चित्रणांत विकारांना महत्त्व आहे कां सुधाकराला व हॅम्लेटला महत्त्व आहे ? सर्व-सामान्य प्रणय, द्वेष, राग, अनुकंपा, मोह, वात्सल्य, क्रौर्य, संशय इत्यादि अनेकविध विकार व त्यांच्या छटा या नाट्यांतून आहेत. पण सूक्ष्म विचारानें असें कळेल कीं केवळ विकारदर्शनच साधण्यासाठीं गडकरी हा नाटककार धडपडत नसून सुधाकराचें व्यक्तित्व रंगविण्याचें ध्येयच त्यानें समोर ठेवलें आहे. व्यक्तिदर्शन हें आधुनिक नाट्याचें, किंबहुना कलेचेंच साध्य आहे आणि विकारदर्शन हें या साध्याला केवळ साधनरूप आहे.

आणखी एका बाजूनें हीच गोष्ट आकलन करणें जरूर आहे. आजच्या नाट्यांतील सर्वच निवेदन किंवा दर्शन हें व्यक्तित्वाच्या भोंवतीं असतें व आवि-ष्कार जसा व्यक्तित्वप्रधान तसाच खुद्द कलावंतहि व्यक्तित्वभावनेनेंच भारलेला असतो. समजा, उद्यां एखादें आजपर्यंत अज्ञात राहिलेलें नाटकाचें हस्त-लिखित अचानक उपलब्ध झालें ! तें वाचून तज्ज्ञ म्हणतील कीं, यांत आम्हांला स्पष्ट दिसतें कीं हें गडकऱ्यांच्या हातचें आहे, इतकेंच नव्हे तर त्यांत अमुक भाग प्रक्षिप्त आहे वगैरे; याचा अर्थ काय ? तर आधुनिक कलाकृतीमध्यें तिचा निर्माताहि आपले नुसते सामान्य विकारच नव्हे तर व्यक्तित्वहि ओतीत असतो. जी गोष्ट नाट्याची तीच कवितेची, शिल्पाची, चित्राची ! ही कविता बालकवींचीच आहे, हें चित्र अमक्याचेंच आहे, असें हमखास म्हणतां यावें, असा कलावंताच्या व्यक्तित्वाचा ठसा त्याच्या प्रत्येक कलाकृतीवर उमटलेला असतो.

या व्यक्तित्वाची एक ढळढळीत खूण म्हणजे आधुनिक कलाकृतीवर कलावंत आपलें नांवहि खोदून ठेवतो. अनामिक कृतींचा हा काळ नाहीं. पण

असा एक काळ होता हें लक्षांत घेतलें म्हणजे नांवांत काय अर्थ आहे तो कळेल. वेरुळ-अजिंठ्यांच्या लेण्यांच्या कल्पकांचें नांव कोठें आहे? मग लहानसहान कृतींचें नांवच नको. उलट, आज अगदीं रटाळापासून रसाळापर्यंत सर्वच कवितांवर नांव, गांव व तारखेचेंहि शिक्कामोर्तब आढळतें.

सारांश, आधुनिक कलेचा आशय व कलावंताचें साध्य आणि व्यवहार ह्या सान्यांवर व्यक्तित्वाचा ठसा असतो. उलट प्राचीन भारतीय कलांचें स्वरूप 'अनामिक' म्हणजे व्यक्ति-निरपेक्ष व सामान्यगुणी असतें. हा फरक नीट आकलन करावयास हवा.

### कलास्वरूपशास्त्रांतील क्रान्ति

पूर्वकालीन सर्वच प्राचीन देशांतील व संस्कृतीं-मधील, व मध्ययुगीन युरोपचीहि, कला ही अशी अनामिक व सामान्यगुणी होती. व्यक्तिमनाचा वारकावा आणि व्यक्तींचीं ( उदाहरणार्थ, हॅम्लेट, नोरा, सुधाकर इत्यादींची ), सुखदुःखें, रागशोक वगैरे दाखविण्यावर तिचा भर नव्हता. या प्राचीन कलेचें साध्य तत्कालीन समाजानें मानलेले मानवी आचरणाचे ठोकळ असे सुष्टदुष्ट आदर्श किंवा नमुने रंगविणें हें होतें. यामुळेंच आज प्राचीनाचें अभिमानी म्हणूं शकतात कीं त्यावेळची कला ही ध्येयवादी होती व धार्मिक व नैतिक श्रेयांचें दर्शन घडविणें हा उद्देश तिच्यापुढें होता. उलट, आजची कला उद्देशहीन किंवा हीन करमणुकीचें साधन बनली आहे! हा अभिमान अर्थातच खोटा आहे. आजची कला व्यक्तित्व-केंद्रित आहे म्हणून श्रेयांच्या बाबतींत आंधळी कशी ठरते? आजचीं श्रेयेंहि भयंकर व खडतर तपस्येनें साध्य होणारीं, जुन्यांहून वेगळीं व आधुनिक आहेत एवढेंच. सुष्ट व दुष्ट हे प्रकार आजच्या व्यक्तित्वांतहि आहेत व आधुनिक कलेचें ध्येय सुष्ट व्यक्तित्वाचा परिपोष व दुष्टत्वाचा पराभव व नाश हेंच आहे.

अनामिक प्राचीन कला व व्यक्तित्ववादी आधु-निक कला हा फरक नीट जाणवेल व ठसेल इतका स्पष्ट करण्यासाठीं वरील विषयांतर पत्करून हा मुद्दा मीं मांडला आहे. हा फरक जर इतका मूलभूत आहे तर प्राचीन व आधुनिक कलास्वरूपशास्त्रांच्या गृहीत प्रमेयांत, युक्तिवादांत, वर्गीकरणांत आणि निष्कर्षांत तोच फरक पडणें अटळ नाहीं काय? कारण शास्त्र हें वस्तुनिष्ठ असतें आणि विषया-बरोबरच त्यालाहि बदलावेंच लागतें.

नाट्यरस, नाट्यभाव इत्यादि संज्ञांच्या व एकंदर नाट्यशास्त्राच्या बाबतींत आधुनिकांची दिशाभूल व गफलत झाली आहे असें मीं पूर्वीं म्हटलें आहे. त्या गफलतीचें मूळ येथें आहे. प्राचीन व आधुनिक कलेमध्यें, व त्यामुळें कलास्वरूपशास्त्रांतहि, झालेली ही क्रांति या आधुनिकांना न कळल्यामुळें त्यांनीं आधुनिक सिद्धान्त आणि युक्तिवाद प्राचीनावर आणि प्राचीन रसव्यवस्था आधुनिक नाट्यावर लादण्याचा व्यर्थ प्रयत्न केलेला आहे.

### रसभावांचा उगम कोठें आहे?

भारतीय, किंबहुना सर्वच प्राचीन कला 'अनामिक' आहे यापेक्षां जास्त पुढें जाऊन तिचें आणखी एक वैशिष्ट्य आपण ओळखलें म्हणजे आपण रसभावविकल्पनाच्या उगमाजवळ सहज पोंचूं. भारतीय महाकाव्यें, नाटकें, शिल्प, मूर्ति-विज्ञान, नृत्य वगैरे सर्वच कलांचे आविष्कार घ्या. त्यांचा उद्देश धार्मिक होता. 'धार्मिक' या शब्दांत भारतीय कर्मवादाचा, दैवतांचा, पुनर्जन्मादि तत्त्वांचा, जन्मसिद्ध जातिव्यवस्था व आश्रमव्यवस्था यांचा, ग्रामसंस्थाप्रधान व राजसत्ताप्रधान समाज-जीवनाचा आणि इतर सर्वच आनुषंगिक बाबींचा समावेश होतो. या 'धर्मा'लाच हवें तर संस्कृति म्हणावें अशी त्या प्राचीन काळच्या जीवनाची एकसंध घडण किंवा घडी होती. सारांश, लौकिक आणि पारलौकिक, नैतिक, सामाजिक आणि व्यक्ति-गत, रूक्ष-व्यावहारिक आणि उत्सवादिक ( कला-त्मक ) अशा सर्व व्यवहारामध्यें आजच्या समाजांत जें द्वैत ( किंबहुना परस्परविरोधीपणा ) उत्पन्न झालें आहे तें प्राचीन काळीं नव्हतें. आज धर्म हा व्यक्तीची स्वतःपुरती पारलौकिकासंबंधीं निष्ठा व व्यवहार उरला आहे. उलट बाकीचें व्यक्तिजीवन व सामाजिक जीवनहि निधर्मी बनलें आहे.

या सर्वगामी व मूलभूत बदलाकडे पाहून मग आपल्याला हें पूर्णपणें व खऱ्या खोल अर्थानें जाणवेल कीं प्राचीन कला ही धार्मिक होती. कारण सर्व जीवनच धार्मिक होतें. उलट, आजची कला निधर्मी










व व्यक्तित्वप्रधान आहे. ती सामाजिकहि आहे पण ती सुद्धां या दोन आधारांना न सोडतांच आहे.

भरतप्रणीत ' रसभाव '-व्यवस्थेचा उगम कोठें सांपडेल, या प्रश्नाची पार्श्वभूमि मीं येथवर थोड्या विस्तारानें दिली आहे. आतां त्या उगमाची चर्चा करूं.

**प्राचीन संस्कृतीचें मूळ : यज्ञ.**

प्राचीन कलेचा उगम धर्मकल्पनांच्या व्यूहांत आहे, एवढ्यावरच न थांबतां आपण खोलांत शिरलों तर आपल्याला दिसून येईल कीं, प्राचीन कलांचा, विद्यांचा व सर्वच जीवनाचा उगम ' यज्ञ ' या प्राचीनतम संस्थेंतून झाला आहे. भारतीय संस्कृतीच्या बाबतींत तर ह्या सिद्धान्ताचें ( व सत्याचें ) सर्वगामी स्वरूप इतकें उघड आहे कीं, तें सहज उमगण्यासारखें आहे. भारतीय तत्त्वज्ञान, ज्योतिर्विद्या, भूमितिशास्त्र, काव्याचे छंद, नृत्य, दैवत–विचार व मूर्तिविज्ञान, उत्सव, व्रतें, जातकर्मापासून अंत्यविधीपर्यंतचे संस्कार, इतकेंच नव्हे तर राजसत्ता, वर्णव्यवस्था, वारसाहक्काचे नियम, इत्यादि बाबीहि यज्ञसंस्थेंतून निघाल्या आहेत. हीच गोष्ट भारताबाहेरच्या प्राचीन संस्कृतीच्या बाबतींतहि खरी आहे.

यज्ञांतून भूमितिशास्त्र, छंद, ज्योतिष, वगैरे निघालें असेल पण नाट्य कसें निघालें, असा प्रश्न आजच्या वाचकांपुढें पडेल. याचें कारण यज्ञासंबंधीं आपलीच धारणा फार कोती असते. यज्ञ म्हणजे एक प्राचीन काळांतील सामाजिक अशी क्रिया होती, ह्याची आपण ओळख विसरलों आहोंत. कोठल्या तरी महत्त्वाकांक्षी राजानें दिग्विजयासाठीं सोईस्कर व पवित्र अशी सबब म्हणून अश्वमेधाचा बूट काढून मुलुखगिरीला निघावयाचें म्हणजे यज्ञ, किंवा एखाद्या अग्निहोत्र्यानें अग्निदेवतेचें मंत्रपूर्वक यजन करावयाचें म्हणजे यज्ञ—असा कोता व विपरीत अर्थ आजच्या आधुनिकांच्या मनांत येतो. वास्तविक यज्ञाची क्रिया सर्व समाजाला समाविष्ट करणारी होती व त्यांत नुसतें हवनच नव्हतें तर एक मोठा प्रदीर्घ उत्सवविधि होता. त्यांत विधि होते, वाङ्मय होतें, गीत होतें व नृत्यहि होतें आणि खरें पाहतां, यज्ञांत प्राचीन काळचीं नाट्येंहि होतीं. आजच्या नाट्यापेक्षां तीं वेगळीं होतीं; तीं या अर्थानें कीं, आजच्या नाट्यांची ' शक्ति ' रंगभूमीपुरतीच आहे, हें समाजानें जाणलें आहे. उलट प्राचीन यज्ञ-नाट्याचा प्रभाव प्रत्यक्ष जीवनावर व पंचमहाभूतांवरहि आहे, असें प्राचीन मानवसमाज मानीत होता. उदाहरणार्थ, यज्ञक्रियेमध्यें महायुद्धें टाळण्याचें किंवा पाऊस पाडण्याचें सामर्थ्य आहे, असा समज अजूनहि भारतीय समाजांतील कांहीं व्यक्तींमध्यें आढळतो. तो समजच प्राचीन काळीं राजांपासून रंकांपर्यंत सर्वांचा होता.

**यज्ञनाट्य म्हणजे काय ?**

आतां आपण रसभावांच्या अगदीं उगमापाशीं पोंचलों आहोंत. कारण यज्ञनाट्य हीच भारतीय नाट्याची गंगोत्री आहे, व त्या नाट्याचें स्वरूप कळलें कीं पुढचा ग्रंथ सहज लागूं शकेल.

यज्ञनाट्याचें स्वरूप आपल्याला दक्ष-यज्ञाच्या कथेंत दिसतें. भरतांनीं आपल्या शास्त्राची परंपरा सांगतांना ब्रह्मा, शंकर, नंदिकेश्वर इत्यादिकांचा उल्लेख केला आहे. अमृतमंथन, त्रिपुरदाह, कंसवध रामचरित, लक्ष्मीस्वयंवर, रंभा–नलकूबर इत्यादि नाट्यें व त्यांचे ' समवकार ', ' डिम ' इत्यादि प्रकार प्राचीनतम काळापासून रूढ होते, असें खुद्द नाट्यशास्त्रांतच भरतांनीं नमूद केलें आहे. खुद्द वेदांमध्येंहि यज्ञप्रसंगीं नाट्यसंवाद व जादूचे प्रयोग वगैरे करीत असत, असा विद्वानांचा अभिप्राय आहे.

ह्या गोष्टीचा उल्लेख खुद्द डॉ. वाटवे यांनीं आपल्या ग्रंथांत केला आहे. तरी पण त्यांच्या मतें परंपरेची ही सांखळी भरतांनीं जरी सांगितली असली तरी नाट्यवेदाला प्रामाण्य आणण्यासाठीं हा अर्थवादाचा, म्हणजे अतिशयोक्तीचा, त्यांचा प्रयत्न आहे ! भरतांनीं ' अंदाज व दैवी उपपत्ति यांची जोड देऊन परंपरेची एक अखंड सांखळी निर्माण करण्याचा प्रयत्न केला ' असें डॉ. वाटवे यांचें मत आहे ( ' रसविमर्श ' पानें ९ व १० पाहा.). या चुकीच्या वृत्तीमुळें परंपरेच्या सत्याला नीट ग्रहण करून त्याच्या बुडाशीं जाण्याची जरूरीच डॉ. वाटवेप्रभृतींना वाटलेली नाहीं. म्हणूनच भरतांच्या रसभावविकल्पनाला परंपरेपासून तोडून








नवी मानसशास्त्रीय उपपत्ति देत बसण्याचा चुकीचा प्रयत्नहि या आधुनिकांनीं केला आहे. हीच वृत्ति आयुर्वेदाच्या आधुनिक टीकाकारांनीं स्वीकारून वात, पित्त, कफ या ' दोषांचा ' आधुनिक वैद्यकानें मानलेल्या ज्ञानतंतूंच्या, पचनाच्या, रक्ताभिसरणाच्या इत्यादि क्रियांशीं मेळ घालण्याचा प्रयत्न केला आहे व आयुर्वेदाचा वेदकालीन विचारांशीं व नंतरच्या सांख्यविचारांशीं जो एकजीव संबंध आहे तो तोडून टाकला आहे. आधुनिक भारतीयांची प्राचीन विद्यांकडे पाहण्याची दृष्टि सर्वच क्षेत्रांत कशी एकाच चाकोरींतून जाणारी व अशास्त्रीय आहे त्याचा हा एक पुरावा आहे. ही दृष्टि टाकून आणि परंपरेचें सत्य गंभीरपणानें मानून व स्वीकारून त्याचा मागोवा घेतच प्राचीन विद्यांचें खरें संशोधन होऊं शकतें, हा सर्वसामान्य विचार, माझ्या मतें, आज दृढ होणें जरूर आहे. त्याच दिशेनें भरतप्रणीत रसभावविकल्पनाचा परंपरेशीं सुसंगत व अखंड असा अर्थ लावण्याचा प्रयत्न मी पुढें करीत आहे.

या ठिकाणीं नाट्याचा, किंवा एकंदरच कलात्मक उद्गारांचा, ' ब्रह्म ' या भारतीय तत्त्वविचारांतील मध्यवर्ती कल्पनेशीं असलेला घनिष्ट संबंध लक्षांत घेतां येईल. ' ब्रह्म ' याचा मूळ अर्थ प्रार्थना किंवा स्तोत्र असा आहे. प्रार्थनेमध्यें ' वर्धना 'ची अनिर्वचनीय अशी शक्ति मानली जात होती. मंत्र म्हणजे कांहीं तरी विलक्षण शक्ति असलेले शब्द असें आज आपणहि समजतों. ' ब्रह्म ' म्हणजे हे मंत्र, स्तोत्रें किंवा शक्तिमान् शब्दच. आपल्याला हव्या असलेल्या गोष्टी ( काम ) मंत्रगायनानें मिळवितां येतात म्हणूनच मंत्राचें गायन हें यज्ञांतील हवनक्रियेइतकेंच ' प्रधानकर्म ' आहे, असें आपल्या प्राचीन ग्रंथांत प्रतिपादन केलेलें आढळतें. ( जैमिनि, २. १. १३ ते २९ या ठिकाणीं याचें विशेष स्पष्टीकरण आहे. )

शब्दांमध्यें अशी मंत्रशक्ति आहे ह्या मूलभूत कल्पनेच्या आधारावरच नाट्यालाहि प्रभावशाली व रसोत्पादक समजणें भरतमुनींना शक्य झालें, हें लक्षांत ठेवलें तर नाट्याचें यज्ञासंबंधीं नाट्यसंवादांशीं व स्तोत्रांशीं असलेलें नातें स्पष्ट होईल. नुसत्या शब्दाला अभिनयादिकांची जोड मिळून त्यांना प्रभावी बनतां येते ही गोष्ट आधुनिक मनालाहि पटते व अनुभवतां येते, पण ती निराळ्या अर्थानें. आपण शब्दांत जें सामर्थ्य मानतों तें प्रत्यक्ष व प्रकट असतें आणि भावना, विचार इत्यादिकांचें वाहन यापेक्षां जास्त किंवा वेगळें सामर्थ्य शब्दांना असल्याचें आपण मानीत नाहीं. उलट, भरतप्रणीत नाट्यशास्त्रांत शब्दसामर्थ्याला असें आधुनिक स्वरूप आलेलें नव्हतें आणि मंत्रसामर्थ्य आणि नाट्यसामर्थ्य तेव्हां एकाच तऱ्हेचें समजलें जात होतें. या फरकामुळें नाट्यभाव, नाट्यरस, इत्यादि भरतप्रणीत शास्त्रीय तत्त्वें आज अनाकलनीय होऊं पहात आहेत. म्हणूनच ब्रह्म, मंत्रगायन, शब्दसामर्थ्य इत्यादि भारतीय कल्पनांचा आधार नाट्यशास्त्राच्या चर्चेत आवश्यक ठरतो.

## यज्ञनाट्य म्हणजे देवासुरकथा

यज्ञनाट्यांतून भारतीय नाट्याचा उगम आहे हें ठाम समजून यज्ञनाट्याचें सामान्य रूप व आशय कोणता होता हें आपण आतां पाहिलें पाहिजे. यज्ञनाट्याचा विषय कोणता होता ? याचें एकच उत्तर आहे. तें नाट्य म्हणजे देवासुरकथा होती. ' कथा ' म्हणजे कथन. कशाचें ? तर देव आणि असुर यांनीं समुद्रमंथन केलें त्या कथेचें, त्रिपुरासुरवधाच्या कथेचें, वज्रनाभवधाच्या कथेचें आणि याच प्रकारच्या अनेक देवासुर-कथांचें. हें कथन अर्थातच नाट्यपूर्ण होतें म्हणजे नाट्यसंवादात्मक पद्धतीनें ते ते प्रसंग प्रेक्षकगणांपुढें प्रत्यक्ष उभे केले जात असत.

देवासुर-कथा ह्या शब्दांबद्दल थोडें स्पष्टीकरण मला केलें पाहिजे. इंग्रजींत ' मायथॉलॉजी ' हें शास्त्र आहे व ' मीथ ' (myth) ह्या शास्त्रीय संज्ञेचाच, प्रतिशब्द म्हणून मी देवासुरकथा हा शब्द वापरीत आहे. नुसता ' दैवतम् ' हा शब्द 'मायथॉलॉजी' या अर्थी ' निरुक्तां 'त आला आहे. ' दैवतम् ' पेक्षां ' देवासुरकथा ' हा शब्द दीर्घ आहे परंतु स्पष्ट अर्थवाही आहे म्हणून मी तो येथें वापरीत आहे. विशेषतः भरतप्रणीत नाट्यशास्त्राच्या अनुषंगानें तर देवासुरकथा हा शब्द फारच सार्थ ठरतो. तो असा : नाट्यशास्त्रामध्यें सुरुवातीलाच एक ' नाट्य ' आहे.












एका प्राचीनतम अशा आद्य नाट्यप्रयोगांत देवांनी असुरांचा पराभव केल्याचें दृश्य दाखविलें गेलें, तेव्हां असुरांना राग आला व ते 'थिएटर'मधून संतापानें बाहेर पडले. तेव्हा ब्रह्मदेवानें त्यांना सांगितलें कीं "बाबांनो! तुम्हाला नाट्याचें मर्मच कळलें नाहीं. तुमचा पराभव दाखविला म्हणून काय झालें? हें नाटक आहे ना? मग त्यांत पराभव कोणाचाहि दाखविला म्हणून काय झालें?" पण दुखावलेल्या असुरांची अशानें समजूत कशी पडणार? तेव्हां ब्रह्मा त्यांना म्हणाले: "भवतां दैवतानां च शुभाशुभ-विकल्पकः। कर्मभावान्वयापेक्षो नाट्यवेदो मया कृतः॥ नैकान्ततोऽत्र भवतां देवानां चात्र भावनम्।" (नाट्यशास्त्र, अ. १. श्लो. १०१, १०२)

वरील श्लोकांत असुर व दैवतें (किंवा देव) यांना एकाच निःपक्षपाती प्रेमानें जवळ करण्याची हमी ब्रह्मदेवानें दिली आहे व नाट्याचें हें खास मर्म म्हणून सांगितलें आहे.

कुठल्या तरी एका आद्य नाट्याच्या पहिल्या प्रयोगाच्या रात्रींच ब्रह्मदेवरूपी मॅनेजरवर आलेला कठीण प्रसंग लाघवी भाषणानें त्यानें निभावून नेला व आपल्या पराभवाची नाट्यें मिटक्या मारीत पाहण्याचें भोळसट असुरांनीं नेहमींसाठीं कबूल केलें, हेंच एक मोठें गंमतीदार नाटक आहे! पण, त्यावरून एक दिसतें कीं भरतांनीं नाट्यशास्त्राची नांदीच मुळीं देवासुरकथेनें केली आहे. नुसतें देवांचे कर्म नव्हे तर देवासुरांचें शुभाशुभ व कर्मभाव नाट्याचे विषय आहेत हीच गोष्ट भरतांनीं अशी स्पष्ट केली आहे.

## देवासुरकथा हा सर्वच कलेचा देह

पण नाट्याचा उगम देवासुरकथेंत आहे यांत नवल नाहीं. कारण भारतीयांच्या सर्वच कलांचा विषय देवासुरकथा आहेत. शिल्प घ्या. प्रतिभावान् शिल्पकारांनीं शिवपार्वतीविवाह, महिषासुरमर्दन, नटराजाचें तांडव अशा अमर कलाकृती शिल्पित केल्या. त्यांना अवघड काय होतें! काळ्या पाषाणाला मऊ मेणाप्रमाणें जणूं काय हातांनीं वळवून गांभीर्य, आनंदादि भाव त्यांनीं या मूर्तींमध्यें जिवंत केले. त्यांना देवासुरांच्या ऐवजीं समकालीन राजांचे, प्रधानांचे किंवा पाणी नेणाऱ्या तरुणींचे पुतळे करणें अशक्य का होतें? पण अशी एकहि कलाकृति एवढ्या शतकानुशतकांच्या शिल्पांत कोठें कोणी प्रसविली नाहीं. हा लौकिक वस्तूंविषयींचा भारतीय कलावंतांचा आंधळेपणा किंवा दूरपणा कशामुळें? इंग्रजी राजवटींतल्या नव्या मराठी कवींनीं एकदम फुलांमुलांचीं व निर्झरांचीं स्वतंत्र गाणीं लिहिलीं. पण मुक्तेश्वरांसारख्या प्रतिभावंतांनींहि अशा विषयांना थारा दिला नाहीं. याचें मर्म हेंच कीं प्राचीन व मध्ययुगीन कलेंतहि देवासुरकथा हाच काव्याचा, नाट्याचा, शिल्पाचा व चित्रांचा एकमेव विषय होता.

मानवी मनानें त्या काळांत जेव्हां जेव्हां कलेचा आकार घेतला तेव्हां तेव्हां, माध्यम कोणतेंहि राहिलें तरी, देवासुरकथाच मूर्त झाली व नटली.

## देवासुरकथेंतील चार रस

भारतीय कलेचें व आधुनिक कलेचें मुख्य विषयाच्या बाबतींतच वेगळेपण आहे ही गोष्ट स्पष्ट केल्यावर आतां आपण भरतप्रणीत रसव्यवस्थेकडे पुन्हा वळूं.

प्राचीन नाट्याचा विषयच जर देवासुरकथा हा आहे, तर त्या नाट्यांच्या शास्त्राचीं सारीं प्रमेयेंहि देवासुरकथेंतूनच निघणें साहजिक आहे. हीच गोष्ट भरतप्रणीत रसव्यवस्थेचा विचार केला तर सिद्ध होते, हा माझ्या पुढील प्रतिपादनाचा आशय आहे.

थोडें आत्मनिवेदनपर सांगावयास हरकत नाहीं कीं, 'रसांचा' देवासुरकथेशीं असलेला हा संबंध मला प्रथम रसव्यवस्थेचीच छाननी करतांना अंतर्गत असाच पण अंधुक दिसला. रस आठच कां? त्यांत मानवी मनाच्या कांहीं मूलभूत, सार्वत्रिक व प्राथमिक प्रेरणांची सूचना आहे पण इतरांची नाहीं, असें कां? शृंगार म्हणजे उज्ज्वल, शुभ असा रस म्हणजे काय? बीभत्साला एवढें प्रमुख स्थान कां? वगैरे अनेक प्रश्न रसव्यवस्थेचा विचार करणाऱ्या प्रत्येक संशोधकाला नडलेले आढळतात. तेथेंच मीहि अडखळलों. डॉ. वाटवे, प्रा. जोग, प्रा. केळकर, डॉ. राघवन्, डॉ. शंकरन् प्रभृति आधुनिकांनीं या कूटप्रश्नांचीं दिलेलीं उत्तरें वाचून माझें समाधान होईना. तसेंच मध्ययुगीन भारतीय साहित्यशास्त्रज्ञांनीं केलेल्या मीमांसाहि अशाच अ-








शास्त्रीय वाटून मी कांहीं तरी नवी दिशा व वाट फुटते कीं काय अशा शोधांत लागलों. तेव्हां नाट्यशास्त्रांतच भरतांनीं खऱ्या मीमांसेची दिशा दाखविली आहे असें मला आढळून आलें व मग देवासुरकथेच्या उगमापर्यंत जाणें मला भाग पडलें.

भरतांनीं या नव्या उपपत्तीची सूचना नाट्यशास्त्रांतच दिली आहे, असें मीं वर म्हटलें आहे. ती सूचना कोठें आहे ? चौखंबा सीरीज्च्या प्रतीमधील एकंदर ४७६ पानांमध्यें रसभावांच्या संबंधीचें विवेचन 'रसविकल्प' व 'भावव्यंजन' या सहाव्या व सातव्या अध्यायांतच फक्त आहे व तेंहि मुख्यतः दोन-तीन पानांतच आटोपलेलें आहे. हीं दोन-तीन पानें सर्वांनीं अभ्यासिलेलीं व वारंवार उद्धृत केलेलीं आहेत.

सहाव्या अध्यायांत प्रारंभींच भरतांनीं म्हटलें आहे कीं, भावादिकांचें मूलबीज रस आहेत आणि 'तदेषां रसानामुत्पत्तिवर्णदैवतनिदर्शनानि अभिव्याख्यास्यामः। तेषामुत्पत्तिहेतवः चत्वारो रसाः। तद्यथा शृंगारो रौद्रो वीरो बीभत्स इति।"

( नाट्यशास्त्र. पान, ७२ )

आठ रस, एकोणपन्नास भाव व असंख्य विभाव, अनुभाव यांच्या अवाढव्य पसाऱ्याची नाट्यसृष्टि कशावर उभारलेली आहे, तर आठ नाट्यरसांचेहि उत्पत्तिहेतु असलेल्या शृंगार, बीभत्स आणि वीर, रौद्र, या चार रसांवर ! हीच भरतांची सूचना आहे व तिचा आपण नीट विचार करूं.

भरतांच्या मतें सर्वच रसभावांचीं नांवें, उत्पत्ति, वर्ण, दैवतें वगैरे बाबी 'आचारोत्पन्न व आप्तोपदेशसिद्ध' म्हणजे परंपरेला धरून आहेत. तेव्हां मूळ रसचतुष्टयाचें स्वरूपहि भरतांच्या मागोमाग जात परंपरेच्या आधारानें आपण ठरविलें पाहिजे.

एकेका रसाचें प्रथम स्वरूप घेऊन मग एकंदर रसचतुष्टयाचा अर्थ पाहणें सोयीचें होईल. म्हणून प्रथम शृंगाराचें रूप पाहूं.

## शृंगार म्हणजे शुभ

शृंगाराचें स्वरूप जरा नीट सावधगिरीनें समजून घेणें इष्ट आहे. कारण शृंगाराचा एकच अर्थ, व तोहि विपर्यस्त तऱ्हेनें घेतलेला, मराठींत रूढ आहे. मूळ नाट्यशास्त्रांत शृंगार हा 'गुर्वाचारसिद्धो हृद्योज्ज्वलवेषात्मकः' असें म्हटलें आहे. त्याचा वर्ण 'श्याम' आणि दैवत 'विष्णु' सांगितलेलें आहे. मराठींत रूढ झालेला अर्थ सूचित करणारें वर्णनहि भरतांनीं दिलें आहे. तें म्हणजे : 'स च स्त्रीपुंसहेतुक उत्तमयुवतिप्रकृतिः' असें वर्णन आहे !

यावरून एक स्पष्ट होतें कीं शृंगाराचें शुभ, उज्ज्वल, हृद्य असें गौरवशाली स्वरूप आहे. शृंग म्हणजे उच्च शिखर किंवा कूट. याच अर्थानें शृंगारिक म्हणजे कूटस्थ किंवा उच्चपदस्थ असाच शृंगाराचा अभिप्राय आहे. मराठीमध्येंहि 'शृंगारणें' या क्रियापदाचा अर्थ शुभ व शोभिवंत करणें असा आहे व तोच प्राचीन व मूळ अर्थाचा खरा प्रातिनिधिक अवशेष आहे. 'श्याम' हा वर्णहि आपल्या परंपरेंत राम, कृष्ण, द्रौपदी, इत्यादि अवतारी व श्रेष्ठ शीलाच्या व्यक्तींचा वर्ण आहे. शृंगाराचें दैवतहि कामदेव नसून विष्णु आहे.

मग शृंगाराचें वर्णन 'स्त्रीपुंसहेतुक' असें करण्यांत भरतांनीं अनौचित्य पत्करलें म्हणावयाचें कीं काय ? शृंगार म्हणजे मॅक्डुगल, शँड, फ्रॉइड प्रभृतींनीं सांगितलेली 'सेक्स' ही सहजभावना आहे असें आपल्या मराठी आधुनिकांनीं म्हटलें आहे. तें जर मानलें तर अनौचित्याचा हा आरोप भरतांवर लादावाच लागेल.

मग हा पेंच कसा सुटतो ? तो 'स्त्रीपुंसहेतुक' म्हणजे काय हें भारतीय परंपरेला धरून नीट ओळखण्यानें सुटतो, आणि भरतांवर अनौचित्य न लादतां सुटतो.

'स्त्रीपुंसहेतुक' शृंगार म्हणजे आधुनिक परिभाषेंतील 'सेक्स' नव्हे, तर शुभ असा मिथुनभाव आहे. आज स्त्रीपुरुषसंबंधाचें विशुद्ध मानसिक ( प्लेटॉनिक ) व शुद्ध शारीरिक असे दोन परस्परविरोधी घटक आपण कल्पिले आहेत व शारीरसंबंधाला हीन व पाशवी गणलें आहे. उलट प्राचीनांनीं मानसप्रेम ( अनंगप्रेम ) व शारीरसंबंध असें कृत्रिम द्वैत बनविलें नव्हतें. परवांपरवांपर्यंत लग्नचिठ्यांवर वधूवरांचा "'शरीरसंबंध' होणार आहे तरी त्याप्रसंगीं हजर राहून मंडपास शोभा







आणावी " अशी विनंति आपण करीत असूं. ' शरीरसंबंध ' हा शब्द प्राचीन काळीं कोणालाच खटकला नव्हता.

मिथुनाचें मानस व शारीर असे सर्वच भाव एकवटून त्यांना प्राचीनांनीं शुभ मानलें होतें. इतकेंच नव्हे तर, सर्व शुभांचें मिथुनभाव हें शृंग मानलें होतें यांतच शृंगार शब्दाची पूर्ण सिद्धि आहे. शृंगार म्हणजेच शुभ. परंतु त्याचेंहि शृंग म्हणजे मिथुनभाव ही कल्पना यज्ञसंस्थेमध्येंच उत्पन्न झालेली आहे. पण प्रस्तुत त्या चर्चेत शिरल्यास फार विषयांतर होईल. तूर्त मी वाचकांच्या एवढेंच नजरेस आणूं इच्छितों कीं, केवळ नाट्यांतच नव्हे तर शिल्पादि कलांत आणि वाजीकरणरूपानें आयुर्विद्येतहि स्त्रीपुरुषसंबंधाला हेंच उच्च स्थान भारतीयांनीं दिलेलें आढळतें. तेंहि निःसंकोच वृत्तीनें व गौरव-बुद्धीनें दिलेलें आढळतें. हीच गोष्ट न ओळखल्या-मुळें मिथुनांचीं शिल्पें प्रमुख मंदिराच्या दर्श-नीय भागांवर पाहून आमचे आजचे प्रेक्षक बावर-तात व लाजेनें अर्धमृत होतात. मिथुनशिल्पें हीं देवदर्शनासाठीं येणाऱ्यांच्या मनांत विषयसुखाबद्दल किळस उत्पन्न करण्यासाठीं खोदलेलीं आहेत असा-हि युक्तिवाद करण्यास आज आधुनिकांची बुद्धि धजावते ! याचें कारण, माझ्या मतें, मिथुनभावाचें भारतीय संस्कृतीमधील स्थानच आजच्या मनाला आकलन झालेलें नाहीं. शुभांत शुभ असें वास्तु म्हणजे मंदिर व त्यावरच मिथुनांचें शिल्प कां ? तर शुभाचें तें उच्चमत प्रतीक म्हणूनच. हा साधा, सरळ व शास्त्रीय विचार आज आपल्याला सुचत नाहीं. पण हा आपल्या बुद्धीचा व दृष्टीचा दोष आहे.

शृंगार हा रस उज्ज्वल, हृद्य, शुभ आणि विष्णुदैवताधिष्ठित आहे व म्हणूनच भरतांनीं ' स्त्रीपुंसहेतुक ' आणि ' उत्तमयुवतिप्रकृतिः ' असें रास्तच म्हटलें आहे.

### बीभत्स हा शृंगाराचा प्रतियोगी

शृंगाराच्या बरोबर उलट असा बीभत्स रस आहे. भरतांनीं याचें वर्णन ' अहृद्याप्रियावेक्षानिष्टश्रवण-दर्शनपरिकीर्तनादिभिर्विभावैः ' उत्पन्न झालेला रस असें केलें आहे. शृंगार हा हृद्य तर बीभत्स हा अहृद्य असें हें द्वंद्व आहे. पण बीभत्साला ' स्वतंत्र आस्वाद्यतेच्या अभावीं ' रसव्यवस्थेतून गाळूनच टाकावें असें डॉ. वाटवे ( रसविमर्श, पानें २४७ व २५३ पहा ) व प्रा. केळकरप्रभृतींचें मत आहे ! त्यांनीं बीभत्साला आधुनिक मानसशास्त्रीय कसोटी लावल्यामुळें हा प्रसंग त्यांच्यावर आलेला आहे. परंतु बीभत्स हा शृंगाराचा प्रतियोगी आहे हें समजून घेतलें म्हणजे ही आपत्ति टळते व भरतप्रणीत व्यवस्थे-ची सार्थता पटते. हा मुद्दा पुढें रसचतुष्टयाचा एकत्र विचार करतांना स्पष्ट होईल; तेव्हां तूर्त पुढें जाऊं. बीभत्साचा वर्ण नील आणि दैवत महाकाल हें आहे. महाकाल हें शंकराचें एक रूप आहे व शंकर ही राक्षसांची आराध्यदेवता आहे. तसेंच शंकराचें दर्शनहि स्मशानवासानें व रुंडमालाधारणानें बीभत्स आहे असें म्हणतां येतें. बीभत्साचें हें वर्णन पुढील विवेचनांत आपल्याला उपयुक्त ठरणारें आहे.

### वीर हा शृंगाराचा सहचर

आतां वीररसाचें स्वरूप पाहा. वीर हा ' उत्तम-प्रकृति, उत्साहात्मक ' असून ' असंमोह, अध्य-वसाय, नयविनय, बहुलपराक्रमशक्तिप्रताप ' इत्यादि विभावांनीं उत्पन्न होतो. ' स्थैर्य, शौर्य, धैर्य, त्याग, वैशारद्य ' हे वीराचे अनुभाव भरतांनीं गणले आहेत. या सर्व यादीवरून काय दिसतें ? तर राम, दुष्यंत, इत्यादि धीरोदात्त राजपुरुषांची नाट्य-कल्पना या वीररसावरूनच करण्यांत आली आहे.

शृंगारिक दर्शन आणि वीरोचित कृति असें धीरोदात्त नायकाचें वर्णन नाट्याच्या परिभाषेत करतां येईल. हव्या त्या साहसाचें किंवा रणकौशल्याचें वीरत्व हें लक्षण नसून असंमोह, त्याग, नय, विनय, इत्यादि गुणहि वीराला आवश्यक म्हणून सांगितलेले आहेत. हें सांगण्याचें कारण असें कीं, नुसती आक्रमणाची जी सहजप्रवृत्ति मनुष्यमात्रांत आढळते तिचा व या वीररसाचा कांहीं संबंध नाहीं. वीरत्व हें ठराविक व्यक्तींच्या कृत्यांचें वर्णनच आहे, हें भरतांच्या वर्णनावरूनच कळून येतें. वीराचा वर्ण गौर व दैवत इंद्र आहे व हें वर्णन सहज पटणारेंच आहे.

### रौद्र हा बीभत्साचा सहचर

शृंगाराचा जसा वीर हा सहचर रस त्याप्रमाणें बीभत्साचा रौद्र हा सहचर आहे. कारण बीभत्स









दर्शन असणारे पुरुष जें कार्य करतात तेंच रौद्र, असा सरळ अर्थ निघतो. रौद्र हा ' संग्रामहेतुक ' आहे व असुरांचेंच हें वैशिष्ट्य आहे, असें भरतांनीं म्हटलें आहे. राक्षसादींचा रौद्राच्या बाबतींत ' किंचाधिकारो गृह्यते । तेहि स्वभावत एव रौद्रा बहुबाहवो बहुमुखा...भीमासितरूपिणः '' असें ते म्हणतात— ( नाट्यशास्त्र. पान ७६ ). रौद्राचा वर्ण तांबडा व दैवत रुद्र आहे.

या वर्णनांतील ' बहुमुखा बहुबाहवः ' या विशेषणाकडे जास्त बारकाईनें पाहिल्यास आपल्याला दशमुख रावणाची मूर्ति दिसूं लागेल. रुद्राला, म्हणजे शंकराला, उग्र तपानें प्रसन्न करून घेऊन मग त्रैलोक्याला त्राहि भगवन् करणारा रावण म्हणजेच बीभत्सदर्शन व रौद्रकर्मा असा नाट्यपुरुष आहे.

रसचतुष्ट्याचे उपकारक रस

आतां शृंगार-वीर आणि बीभत्स-रौद्र या द्वंद्वांचे चार पोषक किंवा उपकारक रस घेऊं. खालीलप्रमाणें हे रस आहेत :

| रस | उपरस | वर्ण | दैवत |
|---|---|---|---|
| शृंगार | हास्य | शुभ्र | प्रमथ |
| वीर | अद्‌भुत | पिंवळा | ब्रह्मदेव |
| बीभत्स | भयानक | काळा | कालदेव |
| रौद्र | करुण | करडा | यम |

या अनुचर रसांच्या बाबतींतहि भरतांची भूमिका सहज समजणारी आहे. हास्यादि उपरस हे मूळ रसांना पोषक आहेत, व ते कांहींशा विरोधाभासानें मूळ रसाला उठाव आणणारे आहेत. हास्याचेंच उदाहरण घेऊं. हास्याचा परिपोष विकृतींत आहे. ही विकृति कशाची ? तर धीरोदात्ताची. ' विकृतवेषालंकारधाष्टर्यलौल्य ' हीं हास्याचीं कारणें भरतांनीं सांगितलीं आहेत. ' उज्ज्वल वेष, धैर्य, त्याग ' यांनीं युक्त अशा शृंगाराची ही विकृति होय. ही विपरीत अनुकृति असल्यामुळें हास्योत्पादक आहे व शृंगाराला जास्तच उठाव आणणारी आहे. प्रमथ ह्या शिवगणाचें रूप व वागणें विदूषकासारखें आहे. तोच हास्याचें दैवत मानला गेला आहे.

विष्णु व नारद, शंकर व प्रमथ आणि राजा व विदूषक यांची जोडी भारतीय परंपरेंत व नाट्यामध्यें फोडतां येत नाहीं, याचें रहस्य आतां कळून येईल.

राजा व विदूषक मिळून जणूं काय एकच व्यक्ति बनल्यासारखी नाट्यांतील वस्तुस्थिति शृंगार-हास्याच्या अभेद्य संबंधानें आपल्याला भरतांनीं सांगितली आहे. या दोन्ही रसांचा अंतिम परिणाम ' प्रसन्नता ' हा एकच आहे.

आजच्या 'हास्या'शीं भारतीय हास्याचें हें वर्णन ताडून पाहणें बरें. आजचें हास्य हें अगदीं सर्कसमधल्या विदूषकाच्या माकडचेष्टांनीं रंगलेलें असतें किंवा चार्ली चॅपलिनच्या मर्मभेदक व करुण विडंबनानें हृदयाला हंसवीत जखमी करणारें असतें. वीराचें किंवा शृंगाराचें विडंबन करून गडकऱ्यांनीं हास्य निर्माण केलें आहे, तें कधीं उथळ तर कधीं मर्मभेदक व दाहक झालें आहे. पण या सर्वच आधुनिक हास्यांत एक स्वतंत्रपणा व स्वयंसिद्धपणा आहे. अनुकृति व विडंबन असलें तरी त्यांत प्राचीन विदूषकाचा अनुचरभाव व परावलंबित्व नाहीं. तसेंच जें हास्य निर्माण होतें त्यानें शृंगाराचा किंवा वीराचा परिपोष साधलेलाच असतो असें नसतें. अनेक वेळीं शृंगार आणि वीर या दोहोंवर हास्यानें कठोर प्रहार केलेला आधुनिक वाङ्मयांत आढळतो.

अद्‌भुत रस हा असाच वीराचा पोषक आणि अनुचर रस आहे. वीर हा पीतगौर तर अद्‌भुत हा पीत आहे. अद्‌भुताच्या भावामुळें वीराचा प्रभाव उठून दिसेल हें सांगावयास नकोच. या ठिकाणीं पुन्हां, प्राचीन रसव्यवस्थेंतील अद्‌भुत व आधुनिक कलेंतील अद्‌भुत यांतील वेगळेपणा स्पष्ट आहे. पो यांच्या भीषण अद्‌भुत कथा, वेल्सच्या विज्ञानरम्य अशा अद्‌भुत कथा किंवा कॅरोलची ' ॲलिस् इन् वंडरलँड ' ही वत्सलरम्य अद्‌भुत कथा ह्यांना आजचें अद्‌भुतरसात्मक वाङ्मय वाटल्यास म्हणावें; पण याचा भरतप्रणीत अद्‌भुताशीं केवळ बादरायणसंबंध आहे. ' दिव्य दर्शना 'नें व इंद्रजालामुळें ' ईप्सितमनोरथ ' दिसल्यानें प्रेक्षकांच्या तोंडून ' साधु ' ' साधु ' असा सहजोद्गार निघतो तेव्हां अद्‌भुताची निर्मिति झाली असें भरत म्हणतात. केवळ शृंगार आणि वीर यांच्याशीं संलग्न







अशा अद्‌भुतापुरती भरतप्रणीत अद्‌भुत रसाची व्याप्ति आहे.

भयानक हा बीभत्साचा अनुचर आहे व त्याच्या स्पष्टीकरणाचें कारण नाहीं.

करुण हा रौद्राचा अनुचर कसा याचें मात्र थोडें विवेचन हवें. रौद्राचें कार्य काय? उदाहरणादाखल, रावणाची कृतीच घ्या: सीताहरण ही रामायणांतील एक रौद्र घटना आहे. पण तिचा रौद्र भाव कशानें स्पष्ट होतो? तर नंतरच्या रामविलापानें, असेंच कोणालाहि सहज पटेल. या अर्थानेंच करुणाला रौद्राचा पोषक रस मानणें योग्य आहे. क्रौंचाच्या विलापानें निषादाचें क्रौर्य उठून दिसलें व रामचरितांतील रौद्र, वीर इत्यादि रसांचा आविष्कार करण्याचें स्फुरण वाल्मीकींना झालें. राम, सीता आणि रावण याच्या कृतींचें क्रौंचवध हें एक प्रतीकच आहे असें दिसून येईल. आणि क्रौंचविलापानें शोकविव्हल होऊन वाल्मीकींनी रामायण रचलें या कविकल्पनेंत करुणाचें सर्वरसप्रमुखत्व सांगितलेलें नाहीं, तर करुणाच्या आधारानें शृंगार-वीर आणि बीभत्स–रौद्र यांचाच परिपोष कसा होतो हें रामचरिताच्या रूपानें प्रत्यक्षच सांगितलें आहे. 'निरपेक्षभाव' अशा करुणाचें स्थान स्वतंत्र न मानतां तें रौद्राला पोषक असेंच भरतादि प्राचीनांनीं मानलें होतें असें स्पष्ट दिसतें.

आधुनिक वाङ्मयांतला करुण 'रस' हा मात्र असा रौद्राचा अनुचर नाहीं; तो स्वतंत्र आहे. व्यक्तित्वाचा गौरव आणि थोर व्यक्तींत दडलेल्या एखाद्याच दोषामुळें त्या उदात्त व्यक्तीला भोगावी लागणारी दारुण व्यथा हा आजच्या करुणकथांचा विषय आहे. त्यांत क्रौर्याला उठाव आणण्याचा उद्देश आजच्या कलावंतापुढें नसतो; तर व्यक्तित्वाच्या अंतर्गत एकांगीपणाचें किंवा एखाद्या अंगभूत दोषाच्या भीषण प्रभावाचें दर्शन वाचकांना व्हावें हा कवीचा उद्देश असतो.

व्यक्तित्वप्रधान असा हा करुणाचा आविष्कार आधुनिक मराठी नाटककारांपैकीं सर्वांनाच साधलेला नाहीं. सुधाकराची व्यथा व दुःख हें व्यक्तित्वप्रधान असल्यामुळें त्यामुळें कोणाच्या क्रौर्याला उठाव मिळत नाहीं व या नाट्यांतील करुणरस हा स्वतंत्रपणें व अविरोधानें सार्वभौम ठरतो. उलट दुसऱ्या निकृष्ट मराठी नाटककारांच्या कृतींमध्यें मध्ययुगीन व प्राचीन पद्धतीनेंच करुणाचा परिपोष झाला आहे, म्हणजे दुःखी पात्रांच्या दुःखाला खलपुरुषाचें (असुराचें) क्रौर्य हें बाह्य कारण आहे असा भावच त्यांच्या नाट्यांतून निर्माण झालेला आहे. प्रा. क्षीरसागर यांनीं गडकऱ्यांच्या नाट्यांतील करुणरसाचें हें मर्म सांगितलें आहेच. त्यांच्या विवेचनाला पोषक असा हा मुद्दा आहे. आधुनिक करुणाचें व्यक्तिप्रधान व स्वयंसिद्ध स्वरूप रौद्राचा अनुचर असलेल्या परावलंबी करुणापेक्षा वेगळें आहे, हाच माझ्या मतें महत्त्वाचा फरक लक्षांत घेण्यासारखा आहे.

## रसचतुष्टयाचें विवेचन

हास्य, अद्‌भुत, भयानक व करुण हे केवळ अनुचर रस आहेत व मूळ रस

| | | |
|---|---|---|
| शृंगार<br>वीर | आणि | बीभत्स<br>रौद्र |

एवढे चारच आहेत, हें येथवर आपण पाहिलें. आतां या चार रसांची कल्पना तरी कशी आली व कशावर आधारलेली आहे, तें पाहूं.

माझ्या मतें, हे चार रस म्हणजे एक द्वंद्वच आहे. शृंगार हें दर्शन आणि वीर ही कृति, तसेंच बीभत्स हें दर्शन आणि रौद्र ही कृति असें वर्गीकरण यांत स्पष्ट दिसतें व या द्वंद्वाचा सरळ व सहज संबंध देवासुरकथेशीं लावतां येतो.

या द्वंद्वाचा विचार करतांना प्रत्यक्ष नाट्याचा दृक्प्रत्यय जर समोर आणण्याचा प्रयत्न केला तर वर्णादिकांचें वर्णन किती सार्थ आहे तें तात्काळ पटेल. 'कथाकली'[1] या केरळीय नाट्याचें पूर्वकालीन

१ या संबंधींची माहिती पुढील लेखांत पहावी: 'Kathakali' by Emily Hatch. pp. 1063–1072, and 'Early Telugu Drama' by Venkataramana, pp,, 1273–1287—Volume of the A. I. Oriental Conference, 1937.










असल्याकारणानें नाट्यामध्यें एक शक्ति संचरूं लागते. या शक्तीचा संचार होत असतांना इतर सर्व भावांतून शक्ति गोळा होत जाते व ती सर्व आठ स्थायी ' भावां ' च्या शक्तिरूपांत केंद्रित होते. ही शक्ति केंद्रित होत होत शेवटीं शिगेला पोंचली कीं एक किमया घडते. ती म्हणजे या शक्तिरूप स्थायी भावांना रसत्व प्राप्त होतें व आतांपर्यंत काव्यार्थांमध्यें अव्यक्त भरून राहिलेले नाट्यरस नाट्याच्या शरीरांत एकदम व्यक्त होतात. लांकडांत सुप्त असलेला अग्नि लांकडाच्या उखळींत दुसऱ्या लांकडाची रवी घुसळून व्यक्त करतां येतो असें प्राचीन काळीं मानीत व यज्ञक्रियेसाठीं असा सिद्ध केलेला अग्नीच वापरीत. म्हणजे लांकडांत अव्यक्त अग्नि असतो ही गोष्ट प्रत्यक्ष प्रयोगामुळें सिद्ध झाल्यासारखी त्यांना वाटत असे. तसाच हा नाट्यरसाच्या अभिव्यक्तीचा प्रकार होता.

काव्यार्थ हे प्रथम नुसते रंगलेले नट असतात. पण त्यांच्या अभिनयादींनी त्यांच्याभोंवतीं ' भाव ' उत्पन्न होतात आणि शेवटीं तर काव्यार्थांचें प्रारंभींचें स्वरूप जाऊन शृंगारादि रसांचेंच मूर्तिमंत रूप म्हणजे काव्यार्थ असा अनुभव येतो. जो प्रारंभीं साधा नट म्हणून रंगभूमीवर येतो तोच नाट्याचा शेवटीं राम किंवा रावण होतो. म्हणजे उत्साह, क्रोध इत्यादि भावांचा इतका परिपोष नाट्यांत होतो कीं उत्साहाचें आश्रयस्थान असणारा नाट्यधर्मी राम हा वीररसाची जिवंत मूर्ति बनतो. लांकडांतील सुप्त अग्नि मंथनप्रयोगानें व्यक्त होतो व त्या लांकडालाच व्यापून टाकतो, ही उपमा भरतांनीं नाट्याला दिली आहे, ती किती सार्थ आहे तें आतां सहज कळून येईल. कारण काव्यार्थांतील सुप्त नाट्यरस नाट्यप्रयोगानें भावशक्तिरूप होतात व मग रसरूप होऊन काव्यार्थाला, म्हणजेच पर्यायानें नाट्यशरीरालाच व्यापतात, असा हा रसनिष्पत्तीचा सिद्धान्त आहे. विभाव, अनुभाव, व्यभिचारी यांच्या संयोगानें रसनिष्पत्ति होते ह्या सूत्राचा अर्थ वरील अनुरोधानें स्पष्टच आहे. संयोग म्हणजेच नाट्यप्रयोगात होणारी सर्व प्रक्रिया. या प्रक्रियेचे आदि-अंत म्हणजे देवासुरकथेंतील रसचतुष्टय व त्यांचा विस्तार होय. माझ्या मतें, हा निष्कर्ष काढला पाहिजे, तरच रसव्यवस्थेचा सर्व अन्वयार्थ लागूं शकतो.

### रसव्यवस्थेचा उपयोग काय ?

हा निष्कर्ष स्वीकारणें म्हणजे रसव्यवस्थेला ती जशी आहे तशी ओळखणें आहे. साहजिकच मग प्रश्न उद्भवतो कीं, रसव्यवस्था जर अशी आहे असें मानलें तर तिचा आज आपल्या साहित्यशास्त्राला उपयोग काय ? या निष्कर्षामुळें रसव्यवस्था आज निरुपयोगी ठरणार असेल तर हा निष्कर्षच निरुपयोगी कां समजूं नये ?

या आक्षेपाला माझें उत्तर एवढेंच कीं प्राचीन विद्यांचें व कलांचें संशोधन आणि आकलन आपण सत्यनिष्ठेनें केलें पाहिजे. सत्यसंशोधनाखेरीज दुसरा हेतु ठेवून आपली दृष्टि विचलित करणें ही प्राचीनांच्या विद्येबद्दल अभिनिवेशाची व अभिमानाची भूमिका आहे. पण ती शास्त्रीय क्षेत्रांत घातुक व भ्रष्ट दृष्टि आहे. यामुळें प्राचीन ज्ञान व विद्या यांच्याशीं दांडगाईचें व मूर्तिभंजकाचें नातें आपण ठेवल्यासारखें होईल.

उपयोगाच्या भूमिकेवरून प्राचीन रसव्यवस्थेचें आकलन करूं पाहणाऱ्या संशोधकांची वरीलप्रमाणेंच गत झालेली नाहीं काय ? ' जुन्या संस्कृत रसव्यवस्थेचें नवीन दृष्टीनें संस्करण करून घेऊन व तिच्यांतील उणीवांची भरपाई पाश्चात्य साहित्यशास्त्रांतील आवश्यक त्या विशेषांनीं करून एका नव्या पण शुद्ध भारतीय पायावर रचलेल्या मराठी साहित्यशास्त्राची आंखणी शक्य आहे ' ही डॉ. वाटवे यांची प्रतिज्ञा घ्या. संस्करण व उणीवांची भरपाई करून निर्माण केलेलें शास्त्र पुन्हां ' शुद्ध भारतीय 'च राहील हा अभिनिवेशच नव्हे का ? डॉ. वाटवे यांनीं ही आपली प्रतिज्ञा पारहि पाडली आहे. ती कशी ? तर ' बीभत्स व रौद्र ' हे रसच डॉ. वाटवे यांनीं रद्द केले आहेत ! आणि त्यांच्या जागीं ' भक्ति ' व ' वत्सल ' यांची त्यांनीं स्थापना केली आहे. म्हणजे भरतांच्या मूळ रसचतुष्टयापैकींच दोन रसांची डॉ. वाटवे यांना अडगळ वाटते ! आणि माझें सारें विवेचन बरोबर असेल तर ' बीभत्स–रौद्र ' ही जोडी काढली कीं उरतें काय ?








एक चाक काढून घेतलेला आणि दीनवाणा पडलेला गाडा. बीभत्स—रौद्र अशा रावणाचें जर उच्चाटन झालें तर सारें रामायणच आटोपलें. तीच अनवस्था डॉ. वाटवे यांच्या योजनेमुळें ओढवते !

नाट्यांत युद्ध ही प्राणभूत व रसोत्कर्षाला प्रेरक गोष्ट आहे. बीभत्स-रौद्रांना काढून टाकल्यावर वीरानें युद्ध कोणाशीं करावयाचें ? प्रणयिनीशीं, भक्तांशीं आणि पोरांसोरांशीं ? तसाच कांहीं तरी प्रकार डॉ. वाटवे यांच्या नव्या नवरसव्यवस्थेमुळें घडण्यासारखा आहे; कारण ते 'भक्ति' व 'वत्सल' यांची नवी भर घालूं इच्छितात.

' भक्ति ' व ' वत्सल ' हे रस घालून मूळ नऊ ही संख्या कायमच राहते, याचें डॉ. वाटवे यांना कौतुकच वाटतें. ते म्हणतात, " नऊ ही संख्या कायम ठेवावी या उद्देशानें वरील योजना केली आहे असें नाहीं. शास्त्रानें व युक्तीनें जें सिद्ध झालें तेंच वर दिलें आहे. या नवीन परिगणनेंत पूर्वींची नवसंख्या कायम राहते ही यदृच्छा ! " ( रसविमर्श, पान २५३ ). या यदृच्छेचें खरोखरच कौतुक केलें पाहिजे ! कारण मुळांतील चार रस व त्यांचा आठ रसांमधील विस्तारच भरतांना मान्य आहे, याची साफ दखल न घेतां रस नऊच आहेत असें प्रथम मानण्याची बुद्धि डॉ. वाटवे यांना या यदृच्छेमुळें झाली व दोन पदरचे रस भरतांना देऊं करून त्यांच्या दोन मूलभूत रसांची मागणी करण्याची, त्याच्याशीं ' देवाण-घेवाण ' करण्याची धीट बुद्धिहि त्यांना याच ' यदृच्छे 'नें दिली !

ही सगळी देवाण-घेवाण. संस्करण, आणि युक्तिवाद ' शास्त्रानें व युक्तीनें ' सिद्ध होतो हें वर डॉ. वाटवे यांचें म्हणणें आहेच. असलें शास्त्र व असली युक्ति हींच माझ्या मतें प्राचीन विद्यांच्या मुळावर येणारीं व आपलें त्यांच्याविषयीचें ज्ञान भ्रष्ट करणारीं ' शास्त्र आणि युक्ति ' आहेत.

संस्करणांची ही वृत्ति प्राचीन विद्यांच्या बाबतींत किती दांडगाईची व घातुक आहे, हें नीट उमगण्यासाठीं प्राचीन वास्तु-रक्षणाचा दाखला घेऊं : जुनीं मंदिरें, वाडे, मूर्ती, नाणीं, ताम्रपट आणि हस्तलिखितें यांचें रक्षण हें एक शास्त्र आहे व प्रत्येक सुसंस्कृत समाजानें आपापल्याला प्राचीन वास्तूंचें आणि वस्तूंचें पराकाष्ठेनें संरक्षण करण्याचा प्रयत्न चालविलेला आपल्याला दिसतो. या शास्त्राचा मूळ दंडकच हा आहे कीं प्राचीन वास्तू आणि वस्तू संरक्षित ठेवणें म्हणजे त्यांचें—त्या उपलब्ध होतील तेव्हां त्यांचें असेल तें—रूप कायम ठेवून त्यांचें संरक्षण करणें हें होय. त्यांत उपयोगाचा किंवा संस्करणाचा प्रश्नच येत नाहीं. संस्करण हें प्राचीनांशीं अनादर दाखविणें होय व उपयोग करून घेणें हा संस्करणाशिवाय हेतु असल्यानें या अनादरांत स्वार्थच भरलेला आहे. शिवकालीन किंवा त्याहून प्राचीन काळांतील, समजा, एक तरवार सांपडली तर लोहाराकडून त्या पात्यांतून विळी तयार करविणें हें क्षम्य ठरेल काय ? किंवा प्राचीन असा एखादा वाडा राहण्यास सोईस्कर करण्यासाठीं त्यांत खिडक्या पाडणें, खोल्या पाडणें आणि विजेची व सांडपाण्याची अद्ययावत् सोय करून घेणें हें कसलें कृत्य ठरेल ?

माझ्या मतें, संस्करणाची ही वृत्ति ठेवून रसव्यवस्थेची अशीच विटंबना आजवर बहुतेकांनीं केली आहे. इतर कांहींनीं वैतागानें रसव्यवस्थेला टाकाऊ ठरवून हात झाडून टाकले आहेत. पण संस्करण किंवा वैतागानें खंडन ह्या दोन्ही वृत्ती खऱ्या संशोधकाच्या नाहींत, तर विटंबनेला कळत वा न कळत हातभार लावणाऱ्या उपयुक्ततावाद्यांच्या आहेत.

प्रस्तुत निबंधांतील निष्कर्ष पुष्कळसे सदोष ठरतील व माझ्याहून पुष्कळच जास्त व सततचा व्यासंग या विषयावर ज्यांचा आहे त्यांना ते दोष सहज दिसतीलच. परंतु, निष्कर्षांच्या बाबतींत माझी मांडणी जरी सुधारावी लागली तरी, रसव्यवस्थेसंबंधींच्या संशोधनाची एक दिशा या दृष्टीनें जरी या निबंधाचा उपयोग झाला तरी माझें कार्य झालें, असें मी म्हणेन.

---








श्री. माधवराव बागल

# मासिकांच्या मुखपृष्ठांवरील चित्रें

मासिकांचीं मुखपृष्ठें या विषयावर चर्चा करण्याचा या लेखाचा उद्देश आहे. कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें, ज्याला लिहितां वाचतां येत असते, अशा प्रत्येक व्यक्तीच्या हातांत, कोणत्या तरी मासिकाचा अंक केव्हां तरी पडत असतोच. म्हणूनच या विषयाला सार्वजनिक स्वरूप प्राप्त झालें आहे. साहित्य हें जसें मनोरंजनाचें आणि प्रचाराचें एक प्रभावी साधन आहे त्याचप्रमाणें कला हेंहि एक साधन आहे. कांहीं बाबतींत कलेची मर्यादा साहित्याहूनहि व्यापक आहे. साहित्याला भाषेचा मर्यादा आहे. ती कलेला नाहीं. ज्यांना डोळे आहेत त्या सर्वांवर ती परिणाम करूं शकते.

छपाईची कला नव्हती त्या वेळीं कलावंतांच्या कलाकृती जेथें ठेवल्या असतील त्या ठिकाणीं जाऊन पहाव्या लागत. आतां अगदीं अल्प मोबदल्यांत त्यांच्या प्रतिकृती कोणाहि व्यक्तीला मिळूं शकतात. त्यामुळें कलाभिरुचि वाढविणें, तिचा दर्जा उंचावणें किंवा खालीं नेणें हें या छपाईच्या साधनामुळें सुलभ होत आहे. कला हें संस्कृतीचें एक मोठें अंग असल्यामुळें तिची अधोगति होणें म्हणजे मानवी मूल्यांतला एक महत्त्वाचा भाग नाहींसा होण्यासारखेंच आहे. थोर कलावंतांचीं कला-प्रदर्शनें पाहण्याची संधि फारच थोड्यांना मिळते. चित्रें हातीं पडतात तीं मासिकांवरील मुखपृष्ठांवरचीं किंवा कॅलेंडरांवरचीं. म्हणून या प्रश्नाला महत्त्व प्राप्त झालें आहे. म्हणूनच मी हा विषय हाताळीत आहे.

आज मुखपृष्ठावरचे चित्रकार प्रामुख्यानें जे दृष्टीसमोर येतात त्यांची संख्या फार मोठी नाहीं. एका हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीच ती अद्याप दिसते. ते चित्रकार म्हणजे—मुळगांवकर, दलाल, शिरुर व ग. ना. जाधव इतकेच. एस्. एन्. कुलकर्णी यांचीं चित्रें अलीकडे दिसत नाहींत.

**नटींचीं चित्रें**

या सर्व चित्रकारांना संख्येनें मारून टाकणारी मुखपृष्ठांवरील दुसरीं चित्रें म्हणजे सिनेमा-नटींचीं; क्वचित् प्रसंगीं सिनेमांतील कांहीं प्रसंगांची; पण त्यांतहि प्रसिद्ध नटी ही असलीच पाहिजे! मासिकांच्या संपादकांना हीं चित्रें जाहिरात-वजा फुकट मिळत असल्यामुळें या चित्रांनीं ज्याच्या मुखपृष्ठावर स्वारी केली नाहीं असें मासिक विरळा! या सिनेमानटींच्या चित्रांनीं मासिकांच्या संपादकांची आणि लोकांच्या अभिरुचीची जेवढी नैतिक हानि केली असेल तेवढी कोणाहि चित्रकाराच्या कृतीनें खास केली नसेल! कलेच्या बाबतींत जनतेवर ही एक आपत्तीच कोसळली आहे असें म्हणावें लागेल! हें पाहिलें म्हणजे ज्या संपादकांनीं आपलें मासिक कोणत्याहि चित्रानें सजविलें नाहीं त्यांचे उपकार मानावे लागतील! कारण त्यांच्याकडून समाजाचें अनहित तरी होत नाहीं. एवढेंच म्हणतां येईल कीं त्यांना कलेची आवड नाहीं, किंवा त्यांना कलेची आवश्यकता वाटत नाहीं किंवा त्यावर खर्च करण्यासारखी त्यांची परिस्थिति नाहीं! पण भिकार चित्रें स्वस्तांत मिळालीं म्हणून तीं छापण्यापेक्षां तें क्षम्यच ठरेल!

यानंतर आतां चित्रकारांच्या कृतींकडे पाहूं. हे चित्रकार फारच थोडे असल्यामुळें त्यांच्या गुणदोषांचा या लेखांत विचार करतां येणें शक्य झालें आहे.








## दलालांची सहजता व आत्मविश्वास

दलालांचीं अनेक चित्रें दृष्टीखालून गेलीं आहेत. रेखा, रंग, रचना व ध्येय यांचा गोड समन्वय त्यांच्या चित्रांत आढळतो. 'आऊटलाईन' चें वैगुण्य छपवण्याकरितां त्यांनीं कोठेंहि छपवाछपव केलेली आढळत नाहीं. त्यांचीं चित्रें पाहतांच त्यांचा 'ॲनॅटमी'चा अभ्यास चांगला झाला आहे हें पटतें. यांच्या स्केचबुकमध्यें अनेक जातींचीं अनेक पेन्सिल ड्राइंग्ज असलीं पाहिजेत असें वाटतें. यांची बौद्धिक उंची वाढलेली दिसते व कांहीं तरी ध्येयवादानें ते भारलेले दिसतात. चित्र काढतांना आणि रंगवितांना अहर्निश कष्टानें मिळविलेली सहजसुलभता आणि आत्मविश्वास त्यांच्या चित्रांत आहे. त्यांचीं चित्रें फाडून निराळीं ठेवावींत असा मोह उत्पन्न होतो. त्यांचें चित्र मासिकावर पाहिलें कीं त्या मासिकाचा दर्जा उंचावतो. नमुन्यादाखल म्हणूनच मी कांहीं चित्रांचा उल्लेख करतों. 'किर्लोस्कर' जून १९५० च्या अंकांवरील दलालांचें चित्र 'मारवाडी धाटणीच्या तीन स्त्रिया' हें सर्व दृष्टींनीं चांगलें आहे. त्यांत संदेश कांहीं नसला तरी हिंदुस्थानांतल्या जातींतील हा एक 'टाइप' आहे. 'स्त्री' मासिकावर अशाप्रकारें, देशांतील निरनिराळ्या जातींच्या स्त्रियांचीं चित्रें जर दाखविलीं गेलीं तर वाचकांच्या ज्ञानांत भर पडेल. व ऐतिहासिक दृष्ट्या त्या चित्रांचें महत्त्व समजून येईल. पण असा प्रयत्न 'किर्लोस्करां'च्या कडूनहि होत नाहीं. या अशा स्त्रियांच्या चित्रांचा आल्बम् सहजा खपण्याजोगा आहे. शैक्षणिक दृष्ट्याहि या चित्रांना महत्त्व आहे.

## निर्दोषपणा सुद्धां केलेला मारक होतो

'किर्लोस्कर' मासिकाच्या १९४७ एप्रिलच्या अंकावरील. प्र. ग. शिरूर यांचें चित्र पहा : 'दिवसभराच्या कामानंतर पिकाचा बोजा हातांत घेऊन परतलेला शेतकरी व सामानाची बुट्टी डोक्यावर घऊन निघालेली त्याची घरधनीण; बरोबर त्यांच्या जीवनाला साहाय्य करणारा त्यांचा खोंड.' हें चित्र शेतांतल्या जीवनाची व आनंदाची कल्पना करून देऊं शकतें. 'किर्लोस्कर' जून १९४९ च्या अंकांतीलहि चित्र चांगलें आहे. पण या प्रकारचीं फारशीं चित्रें, शिरूर काढीत नाहींत. त्यांचीं चित्रें आकर्षक असतात. 'आउटलाईन'मध्यें व रंगामध्यें दोष क्वचितच आढळतील. पण बरींच चित्रें त्यांच्या नोटबुकांतील स्केचेस्च्या आधारें काढलीं असतील, असें चित्र पाहून वाटत नाहीं. बहुतेक चित्रांना फोटोग्राफचा आधार घेतल्यासारखा वाटतो. म्हणून त्यांतील वाटणारा निर्दोषपणा सुद्धां कलेला थोडा मारकच वाटतो. बहुतेक चित्रांचा हेतु मनोरंजन हाच असतो. चित्रांत वरच्या वर्गाचेंच चित्रण विशेषेंकरून आढळतें. खालच्या जनतेच्या जीवनांतील चित्रें फारशीं आढळत नाहींत. ध्येयाचा विचार मला स्वतःला फारसा कोठें आढळला नाहीं. निव्वळ मनोरंजनावरच जास्त भर दिला जातो. माझ्या दृष्टीनं हें एक यांच्या चित्रांत जाणवण्याजोगें वैगुण्य आहे. हें काढून टाकल्यास त्यांची कला आकर्षक आहे तशी उद्बोधकहि होईल.

## ग. ना. जाधव यांची सर्वांगीण प्रगति

ग. ना. जाधव हे उदयोन्मुख असे तरुण कलावंत आहेत. त्यांची प्रगति फार झपाट्यानें होत आहे. ते दलाल आणि शिरूर यांच्या पंक्तींत आजच येऊन बसले आहेत. इतर अनेक चित्रकारांप्रमाणें यांनीं आपलें 'स्केचबुक' टाकलेलें नाहीं, हें त्यांच्या प्रत्येक चित्रावरून समजून येतें. 'किर्लोस्कर' मधील गोष्टींत येणारीं त्यांचीं 'पेन ॲण्ड इंक्' स्केचेस इंग्रजी मासिकांतल्या धंदेवाईक कलावंतांशीं स्पर्धा करूं शकतील. त्यांच्या स्केचीसमध्यें अलीकडे जोर असतो व आत्मविश्वास असतो. किती तरी वेळां, बाहेरच्या इतर चित्रकारांच्या रंगीत चित्रांपेक्षां ग. ना. जाधव याची आंतील स्केचेस अधिक वरच्या दर्जाचीं असतात. त्यांची होत असलेली ही सर्वांगीण प्रगति पाहून, त्यांनीं आपला व्यवसाय असाच निष्ठेनें आणि नम्रतेनें चालविल्यास त्यांचें भवितव्य फार आशादायक होईल असें वाटतें. रेखा, रंग, रचना व ध्येय हीं सर्व साधण्याचा ते यशस्वी प्रयत्न करीत आहेत. त्यांचें वाचनहि होत असावें असें वाटतें. तें त्यांनीं वाढविलें पाहिजे. कलावंतांना वाङ्मयाचीहि अत्यंत जरूरी असते हें आमचे बरेच कलावंत विसरतात. त्यांच्या विचारांत विचाराची खोली यांचमुळें येत



अनुक्रमणिका






नाहीं. कलावंत स्वतः सुसंस्कृत असेल तर त्याची संस्कृति त्याच्या कलाकृतींत आपोआपच उतरते. वाचन हा एक कलाव्यासंगांतीलच एक भाग समजून त्यांनीं नवे नवे विचार आत्मसात् केले पाहिजेत. मार्क्सवादी दृष्टिकोन कलाकारालाहि आला पाहिजे. म्हणजे तो रोजच्या जीवनाकडे जनहिताच्या दृष्टीनें पाहूं लागतो व त्याचीं चित्रें समाजाला मार्गदर्शक होऊं लागतात.

खालच्या श्रमजीवी समाजाचें जीवन दाखविण्याची वृत्ति ग. ना. जाधव यांच्यांत दिसूं लागली आहे.

जुलै १९५० च्या 'किर्लोस्कर'वरील त्यांच्या चित्रांत खेडवळ समाजांतील गोड जीवन, त्यांतील गोड भावना, मानवी जीवनाबाहेरहि प्रकट झालेलें प्रेम हीं दिसून येतात. शेतकरणीचें पाडसावरचें प्रेम चित्रांत चांगलें दाखवलें गेलें आहे. त्यांनीं आपल्या चित्रांना आधार नोटबुकाचाच घेत जावा. फोटोग्राफचा आधार चित्रांत कृत्रिमता आणतो. 'किर्लोस्करां'च्या कारखान्यांतील प्रमुखांच्या छायाचित्रांना स्वतंत्र चित्रांचें स्वरूप देण्यानें कलेचा दर्जा वाढणार नाहीं. अशा चित्रांत 'लाइकनेस' आणण्याचें कसब जरी दिसून आलें तरी चित्रकाराची अंतःस्फूर्ति मात्र मरून जाते.

### इंग्रजी चित्रांची हीन प्रतिकृति

मुळगांवकर यांच्या चित्रांनीं अलीकडे बऱ्याच मासिकांवर आक्रमण केल्याचें दिसत आहे. मुळगांवकर यांच्या चित्रकलेबद्दल काय लिहावें ? त्यांच्या तंत्र-कौशल्याबद्दल स्तुति करावी कीं त्यांच्या चित्रांतील प्रसंगांच्या निवडीची स्तुति करावी ? त्यांच्या चित्रांतील गुणावगुणांची चिकित्सा केल्यास काय आढळतें ?

ज्याला चित्रकलेचें कांहीं तंत्र माहीत आहे त्याला या चित्रांत चित्रकारानें 'ॲनॅटमी'चा अभ्यास केला असल्याची शंकाहि येणार नाहीं. त्यांचा प्रत्यक्ष 'लाइफस्टडी' झाला असें वाटत नाहीं. प्रत्यक्षावरून अभ्यास केल्यानंतर 'आउटलाइन'मध्यें व ब्रशमध्यें जो एक जोर आणि आत्मविश्वास ( Confidence ) दिसतो, तो यांच्या कोणत्याहि चित्रामध्यें दिसून येत नाहीं. यांच्या चित्रांतील हातांपायांचीं बोटें पाहिलीं म्हणजे यांच्या अभ्यासांतील कच्चेपणा स्वच्छ दिसून येतो.

कोणतेंहि चित्र पाहावें, तें कुठल्या तरी एका इंग्रजी चित्राची हीन दर्जाची प्रतिकृति आहे असें वाटूं लागतें. हिंदी पेहेरावानें इंग्रजी मासिकांतील चित्र किंवा एखाद्या युरोपियन स्त्रीचा फोटो रंगवावा त्याप्रमाणें बहुतेक सर्व चित्रें दिसतात. त्यांतहि 'ॲनॅटमी' व मसल्स, सांगाडा आणि स्नायू यांचा अभ्यास नसल्यामुळें, किंवा केला असल्यास चित्रांत त्याचा मागमूस दिसत नसल्यामुळें सारीं चित्रें मेणाचीं किंवा शाडूचीं वाटतात. तींहि तंत्र न समजलेल्या माणसानें काढल्यासारखीं दिसतात. इंग्रजी चेहऱ्याला कुंकू लावावें, त्याच्या हातांत कांकणें घालावींत आणि डोक्यावरून पदर टाकावा त्याप्रमाणें यांच्या स्त्रियांचीं चित्रें दिसतात. पेहेराव हिंदी; हावभाव व ठेवण इंग्रजी. पाहायचें तर चेहरा पाहावा, हातांपायांचीं बोटें पाहूं नयेत, मांसल भागाचें वळण पाहूं नये, सारें गुळगुळीत !

मुळगांवकरांचें कोणत्याहि मासिकावरील कोणतेंहि चित्र पाहिलें तर नटीच्या फोटोचें रंगीत चित्र दिसतें. त्यांत तंत्रशुद्धता मिळणार नाहीं. ध्येय नाहीं. नैतिक मूल्यें आढळणार नाहींत. आश्चर्य आणि दुःख वाटतें कीं, अशा चित्रांचा भाव मासिकांनीं वाढवावा ! आपण जनतेची अभिरुचि बिघडवतों व मासिकाचा आणि वाचकांचा सांस्कृतिक दर्जा खालीं आणतों, याची जाणीव संपादकांना नसते !

एखाद्या चित्रपटांतील सुंदर आणि मोहक नटीचा पदर खालीं पडल्यावर—वस्तुतः तो मुद्दामच पाडला जातो—टाळ्या पडाव्यात, कांहीं कामुक, उत्तान प्रसंग आले कीं 'वन्स मोअर' व्हावें, आणि या शिफारशीवर त्या चित्रपटाची लोकप्रियता वाढावी, तसाच प्रकार मुळगांवकरांच्या चित्रांचा झालेला दिसतो.

सर्वसाधारण जनतेला उदात्त, ध्येयवादी आणि तंत्रशुद्ध चित्रें पाहण्याचा योग येत नाहीं. त्यांना जीं चित्रें नेहमीं दिसतात तीं कॅलेंडरवरचीं आणि मासिकावरचीं. ज्यांच्या योगानें चित्रकलेची आवड जनतेंत उत्पन्न व्हायचीं तीं हीं साधनेंच इतकीं बाजारी आणि हीन दर्जाचीं आणि ध्येयशून्य अशीं झाल्यावर जनतेच्या कलाभिरुचीचा दर्जा कसा








वाढणार ? अशा लोकांची अभिरुचि बिघडविणाऱ्या व त्यांची नैतिक दृष्ट्या हानि करणाऱ्या चित्रांना स्थान देण्याऐवजीं त्या मासिकांनीं आपलीं मुखपृष्ठें कोरीं ठेवलीं तरी तें अभिनंदनीय ठरेल ! मी असें ऐकतों कीं अशा चित्रकारांना महिना हजार रुपयावर प्राप्ति आहे. ही एवढी मिळकत म्हणजे जनतेचा तेवढा अधःपातच होय.

## केवळ नग्नता म्हणजे अश्लीलता नव्हे

नग्नता म्हणजे अश्लीलता असें मानणाऱ्या सोंवळ्या कृष्णराव मराठ्यांच्या वर्गांतला मी नाहीं. नग्नतेंतहि पावित्र्य असतें, नग्नता उदात्त भावना जागृत करूं शकते. ज्या भावनेनें तीं चित्रें काढलेलीं असतात त्या भावनेचा परिणाम त्या चित्रांवर होत असतो. जगांतील अगदीं पहिल्या दर्जाचीं कांहीं चित्रें विवस्त्रच आहेत. व्हीनसच्या विवस्त्रतेकडे लक्षच जात नाहीं. त्या चित्रानें आपल्या नैतिक मूल्यांना जराहि धक्का बसत नाहीं. कामुक भावना उत्पन्न होत नाहीं. आणि सवस्त्र असूनहि कांहीं चित्रें बीभत्स, कामुक आणि मनुष्यांतील हीन भावना जागृत करणारीं असतात. सप्टेंबर १९५० च्या 'किर्लोस्कर' अंकांवरील मुळगांवकरांचें चित्र या सदरांत पडेल. मुळगांवकरांची जीं चित्रें माझ्या पाहण्यांत आलीं त्यांत ध्येय, संदेश यांपैकीं क्वचितच कांहीं आढळेल. पैसे मिळविण्यापलीकडे मुळगांवकरांची धांव गेलेली दिसत नाहीं. गुळगुळीत चेहरे, उत्तान प्रसंग, कामुक भाव हेच या कलावंतांच्या कलेचें ध्येय दिसतें. यांनीं कलेची सेवा करण्याऐवजीं, तिचा व जनतेच्या अभिरुचीचा दर्जा मात्र खालीं आणला आहे.

मासिकावर चित्रें काढणारे अनेक असतील. त्या सर्वांचा आणि त्यांच्या प्रत्येक चित्राचा परामर्श घेणें शक्य नाहीं. वरील चार चित्रकारांची अनेक चित्रें माझ्या पाहण्यांतून गेलीं आहेत. त्यांवरून त्यांच्या गुणावगुणांचा आराखडा काढतां येतो, त्यांची सर्व साधारण वृत्ति कळून येऊं शकते. शंभर दीडशें चित्रें जवळ ठेवूनच मी निष्कर्ष काढूं शकलों. मासिकांनीं मिळेल तें चित्र न घेतां चांगल्याच चित्राची निवड करावी व लोकांची अभिरुचि वाढवावी, तिला चांगलें वळण द्यावें या हेतूनेंच मीं हा लेख लिहिला आहे.

---

## शॉ यांच्या विनोदोक्ती

भारतीयांना जसे बिरबल तसे विद्यमान जगाला बर्नार्ड शॉ बनून राहिले होते. त्यांच्या जीवनचरित्रांत त्यांच्याविषयींच्या बुद्धिचातुर्यमय दंतकथांचाच विशेष भरणा आहे. एक सौंदर्यराज्ञी शॉंना एकदां म्हणाली : ' आपण लग्न करूं या, म्हणजे आपणांस तुमच्या बुद्धिमत्तेनें आणि माझ्या सौंदर्यानें परिपूर्ण असें अपत्य होईल'. शॉ लगेच उत्तरले, ' पण त्या कार्यांत तुझी बुद्धिमत्ता, आणि माझें सौंदर्य उतरलें तर ? '—एकदां श्रोत्यांच्या तुफान गर्दींत शॉ भाषण करायला उभे राहिल्याबरोबर एका रुष्ट श्रोत्यानें निषेधप्रदर्शक आवाज काढला. तत्काळ शॉ उद्‌गारले, " सज्जन गृहस्था, तुझ्याशीं माझें मतैक्य आहे. पण या इतक्या लोकांपुढें आपलें दोघांचें काय चालणार ? "—मि. ए. जी. गार्डिनर यांनीं त्यांना एकदां जेवायला बोलावलें. शॉ गेले. पण, जेवण आटोपल्यावर. मृत प्राण्यांवर हात मारणाऱ्यांच्या पंक्तीस आपण बसत नसतों, अशी उशीर-मीमांसा त्यांनीं केली !

—'नवशक्ति' (मुंबई) ३-११-५०








प्रा. प. वि. पटवर्धन

# अवमूल्यनाची फलश्रुति

## अवमूल्यनाची पार्श्वभूमि

चलनाचें अवमूल्यन म्हणजे एखाद्या देशाच्या आंतरराष्ट्रीय व्यापारांतील मूलभूत विषमता नष्ट करण्याचा एक तोडगा आहे. आणि तोडगा करणाऱ्या माणसाला ज्याप्रमाणें व्रतस्थ राहून कांहीं कडक नियम पाळावे लागतात आणि त्याच्या सिद्धीस दैवाचाहि हातभार लागावा लागतो, त्याचप्रमाणें चलनाचें अवमूल्यन करणाऱ्या देशालाहि नियंत्रणांची तोशीस सोसावी लागते; आणि त्याच्या तोडग्याचें यशापयशही बऱ्याच अंशीं दैवायत्त गोष्टींवर अवलंबून असतें.

आंतरराष्ट्रीय व्यापारांत देशादेशांत देणीं-घेणीं चालू असतात आणि हे व्यवहार परस्परांतील आयात-निर्यातीवर किंवा प्रत्यक्ष सुवर्णदानानें भागविले जातात. आंतरराष्ट्रीय व्यापाराचें महत्त्वाचें तत्त्व म्हणजे ज्या देशाकडून आयात केली त्या देशाच्या चलनांतच त्याचें देणें भागवावें लागतें. आणि हें चलन निर्माण करणें म्हणजे आपल्या देशांतून त्या देशाला माल पाठविणें व तो देश आपणाला जें देणें निघेल त्या देण्यांतूनच आपलें त्या देशाचें देणें भागविणें होय. एखाद्या देशाला आंतरराष्ट्रीय व्यापारांत जर दीर्घ कालपर्यंत तूटच येऊं लागली—म्हणजे निर्यातीपेक्षां आयातच सारखी जास्त होऊं लागली—व आयातीचीं देणीं भागविणें दुरापास्त होऊन बसलें, धनको देशांकडे स्वतःच्या मालाची निर्यात करणेंहि शक्य नसलें व सुवर्णसंचयहि नसला, म्हणजे मग आत्यंतिक उपाय म्हणून तो देश आपल्या चलनाची इतर चलनांतील किंमत कमी करून, अवमूल्यन करून अशा प्रकारें स्वतःचें चलन आंतरराष्ट्रीय बाजारांत स्वस्त करून टाकतो. याचा परिणाम असा होतो कीं इतर देशांना, अवमूल्यन झालेल्या देशांत माल घेणें अधिक हितावह वाटतें. त्या देशांत आतां, पूर्वींच्या रकमेला, पूर्वींपेक्षां अधिक वस्तू मिळतात. उदा० समजा, पूर्वीं १ डॉलरला ३।। रु. मिळत असले, आणि आतां रुपयाचें अवमूल्यन झालें, तर आतां १ डॉलरला ३।। रु. पेक्षां कांहीं अधिक रुपये मिळतील. समजा, नवा दर १ डॉ.= ५ रु. ठरला; याचाच अर्थ असा कीं, ज्यांच्या किंमती रुपयामध्यें आहेत अशा वस्तूहि १ डॉलरला पूर्वींपेक्षां अधिक मिळतील. म्हणजेच, पूर्वीं १ डॉलरला हिंदुस्थानांत जर ३।। रु. चे पदार्थ मिळत असतील तर आतां ५ रु. चे मिळूं लागतील. डॉलर हें चलन वापरणाऱ्या लोकांना हिंदी पदार्थ घेण्याची अधिक इच्छा होईल; म्हणजेच पर्यायानें हिंदुस्थानची निर्यात डॉलर–चलन असणाऱ्या देशांत वाढेल. उलटपक्षीं, रुपये जसे डॉलर्समध्यें स्वस्त झाले, तसे डॉलर्स रुपयांत महाग होतील व पूर्वीं १ रु. स $\frac{2}{7}$ डॉलर मिळत असेल तर आतां फक्त $\frac{1}{5}$ च मिळूं लागेल. म्हणजेच पूर्वींइतक्या रुपयांना डॉलर-चलन विभागांत कमी पदार्थ विकत मिळतील. व हिंदी लोकांना डॉलरविभागांत खरेदी करणें परवडणार नाहीं. म्हणजेच पर्यायानें डॉलर-चलनविभागांतून हिंदुस्थानची आयात कमी होईल किंवा थांबेल. अर्थात् अशा प्रकारच्या अवमूल्यनास इतर देशांची मंजुरी असेल तरच अवमूल्यन करणाऱ्या देशाचें हित साधेल. नाहीं तर इतर देशहि अवमूल्यन करूं लागले तर कोणाचाच फायदा होणार नाहीं. आंतरराष्ट्रीय परिस्थिति पूर्ववत् राहील किंवा

चिघळलेलहि. अशा गंभीर उपायास आंतरराष्ट्रीय मंजुरी मिळतेहि; मात्र त्याला परिस्थितिहि तशीच बिकट असावी लागते.

दुसऱ्या महायुद्धानंतर जगामध्यें निर्माण झालेल्या डॉलर-चलनाच्या वर्चस्वाचें अवमूल्यन हा एक परिणाम आहे; आपली प्रभावी उत्पादनशक्ति आणि अलोट संपत्ति यांच्या योगानें अमेरिका ( U.S A. ) ही जगाची बाजारपेठ बनली, व सर्व जगाला माल पुरवूं लागली. इतर देशांजवळ माल अमेरिकेंत खपविण्यासारखें फार कांहीं राहिलें नाहीं. खुद्द इंग्लंडसारख्या एके काळच्या ' जगाची बाजारपेठ ' असलेल्या साम्राज्यसंपन्न देशालासुद्धां आपल्या उद्योगधंद्यासाठीं, अन्नसामग्रीसाठीं, माल खरेदी करावयास अमेरिकन चलनाची चणचण भासूं लागली. युद्धसमाप्तीनंतर इंग्लंडच्या सुवर्ण व डॉलरनिधीमध्यें इतकी गळती लागण्याचें कारण म्हणजे इंग्लंडची अमेरिकेंतील व कानडांतील जिंदगी युद्धापायीं नष्ट झाली, तिचें नाविक उत्पन्न घटलें, मलायांतील पत्र्याच्या धंद्याचा नाश झाला व कृत्रिम रबराच्या उत्पादनामुळें नैसर्गिक रबरापासूनहि उत्पन्न येईनासें झालें. ज्यायोगें डॉलरचलन मिळावयाचें ते सर्व मार्ग बंद झाले. मार्शल–मदत, त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय बँकेनें व अमेरिका-कानडा यांनीं दिलेलीं कर्जेंहि, संपून गेलीं आणि मार्च १९४८ चे अखेरीस इंग्लंडला आंतरराष्ट्रीय व्यवहारांत सुमारें १४९ कोटी डॉलर्सची तूट आली. शिवाय स्टर्लिंग चलनगटाची मध्यवर्ती डॉलर ठेवसुद्धां ४०० कोटी डॉलर पासून अवघ्या १३४ कोटींपर्यंत येऊन ठेपली ! अशा परिस्थितींत इंग्लंडच्या चलनाचें परराष्ट्रीय बाजारांतील वजन कमी होऊं लागलें व इंग्लंडमधून भांडवलाच्या पलायनाची भीति वाटूं लागली. इंग्लंडनें आंतरराष्ट्रीय द्रव्यनिधी-( I. M. F. )-कडे पौंडांच्या अवमूल्यनाची परवानगी मागितली आणि अमेरिकन वर्चस्वाखालील त्या संस्थेनें ती दिलीहि; कारण अमेरिकन उद्योगधंद्यांच्या प्रगतीच्या दृष्टीनेंहि अमेरिकन मालाचा उठाव होणें इष्ट होतें. ज्या योगें इतर देशांची ग्रहणशक्ति वाढेल असे सर्व उपाय योजणें अमेरिकेलाहि हितावहच होतें. म्हणूनच इंग्लंडनें अवमूल्यन करण्यास अमेरिकेचा विरोध झाला नाहीं.

१९ सप्टेंबर १९४९ रोजीं इंग्लंडच्या मागोमाग हिंदुस्थाननेंहि आपल्या रुपयाचें डॉलरमध्यें अवमूल्यन केलें. इंग्लंडप्रमाणेंच सप्टेंबर १९४९ च्या सुमारास हिंदुस्थानची परिस्थितीहि अतिशय अनुकंपनीय होती. परराष्ट्रीय व्यापारांतील तूट मार्च १९४९ अखेर ९५ कोटी रु. गेली होती. १९४६ ते १९४८ अखेर आपल्या स्टर्लिंग ठेवींतील एकूण ६४२·४२ कोटी रक्कम संपुष्टांत आली होती. चलनवाढ भरमसाट होऊन उत्पादन घटत होतें. अशा वेळीं निर्यात वाढविणें अत्यावश्यक होतें; परन्तु बंधनें, नियंत्रणें वगैरे नेहमींच्या उपायांनीं तें साध्य झालें नव्हतें. रुपयाचें अवमूल्यन हा एक उपाय होता. परन्तु तो स्वीकारणें स्टर्लिंग गटांतील हिंदुस्थानला एकट्याला शक्य नव्हतें. परन्तु स्टर्लिंगगटाचा नेता इंग्लंड ह्यानेंच जेव्हां या आत्यंतिक उपायाचा अगतिकपणें पुरस्कार केला त्या वेळीं हिंदुस्थाननेंही त्याचा स्वीकार केला; दडपणानें नव्हे, स्वेच्छेनें, कांहींशा आशावादीपणानें केला. व तत्कालीन अर्थमंत्री श्री. जॉन मथाई यांनीं रुपयाचें ३०·२२५ सेंटपासून २१ सेंट पर्यंत अवमूल्यन केल्याचें जाहीर करून त्याच्या समर्थनात्मक संसदेंत वक्तव्य केलें व नवीन धोरणाचें विशदीकरण करणारें एक पत्रकहि प्रसिद्ध केलें.

### अवमूल्यनाचीं साध्यें.

सामान्य माणसाच्या मनांत अवमूल्यनाचे पुढील परिणाम येतातः ( १ ) निर्यातींत वाढ, ( २ ) आयातींत घट व या दोहोंमुळें आंतरराष्ट्रीय व्यापारांतील बाकीमध्यें अनुकूल असा फरक, ( ३ ) निर्यात उद्योगधंद्यांना तेजी ( ४ ) आयातीवर अवलंबून असणाऱ्या उद्योगधंद्यांबाबत साशंकता आणि ( ६ ) घबराटीमुळें किंमतवाढ.

सापेक्षतेनें अवमूल्यनाचे परिणाम हे होऊं शकतील. मात्र अवमूल्यनाचे परिणाम कांहीं स्वीकृत प्रमेयां-( assumptions ) वर अवलंबून आहेत. उदा०, निर्यातीची वाढ, अवमूल्यनानंतर निर्यातीला पूर्वींइतकीच मागणी राहिली, तरच शक्य आहे. तसेंच, अवमूल्यन न केलेल्या देशांनीं आपल्या











पदार्थांच्या किंमती कमी न केल्या तरच अवमूल्यन झालेल्या देशांत ते पदार्थ महाग होतील, व मागणी स्थिर असल्यास आयात घटेल. पण आंतरराष्ट्रीय स्पर्धेनें प्रेरित होऊन अवमूल्यन न झालेल्या देशांतील लोकांनीं पदार्थांच्या किंमती उतरविल्या तर त्या देशांतून आयात घटणार नाहीं; तेवढीच राहील किंवा, किंमत फार उतरविली असल्यास, वाढेलहि. अवमूल्यनाचे अभिप्रेत परिणाम 'असंभाव्य गोष्टी होणार नाहींत' या संकेतावरहि आधारलेले असतात उदा०, आंतरराष्ट्रीय युद्धें सुरू झालीं किंवा अकल्पित रीतीनें एखाद्या राष्ट्रानें असहकार्य पुकारलें, तर इष्ट ते परिणाम घडून येणार नाहींत. हिंदुस्थानच्या अवमूल्यनावर कोरियन युद्धानें व पाकिस्तानी असहकार्यानें असेच तडाखे मारले आहेत. शिवाय हेंहि लक्षांत ठेवावयास पाहिजे कीं अवमूल्यनाचें आगमन म्हणजे नियंत्रणांचा सुळसुळाट होय. आयात–निर्यातीवर बंधनें, किंमतीवर बंधनें, उत्पादनावर नियंत्रणें इत्यादि बंधनांच्या राज्यांतच अवमूल्यनाचा प्रकर्ष होतो. तेव्हां केवळ अवमूल्यनच असतें अन् बंधनें नसतीं तर जे परिणाम झाले असते ते केव्हांहि होणार नाहींत. या नियंत्रणांपैकीं कांहीं अवमूल्यनाचे सुपरिणाम अधिक स्पष्ट करण्याकरितां असतात, कांहीं अनिष्ट परिणामांचें निवारण करण्याकरितां अवलंबिलेलीं असतात. लोकांच्या सहकार्याशिवाय नियंत्रणांना केव्हांच यश येत नाहीं. ज्या प्रमाणांत नियंत्रणांची अम्मलबजावणी होईल त्या प्रमाणांतच अवमूल्यनाला यशापयश मिळेल.

शेवटीं एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, रुपयाचें अवमूल्यन डॉलरमध्यें झालेलें आहे, पौंडांत नाहीं. आणि रुपया-स्टार्लिंगचा पूर्वींचाच दर कायम राहिला आहे ( १ रु. = १ शि. ६ पे. ).

## आंतरराष्ट्रीय व्यापारांतील तुटीची भरपाई

अवमूल्यनाचा सर्वांत महत्त्वाचा उद्देश म्हणजे आंतरराष्ट्रीय व्यापारांतील तूट ( Adverse Balance ) भरून काढणें हा होय. त्या दृष्टीनें खालील[1] आंकडे उद्बोधक आहेत.

त्यावरून स्पष्ट होतें कीं अवमूल्यनानंतरच्या सहा महिन्यांत निर्यातीची वाढ झाली व आयातहि बरीच घटली. आयात घटण्यास अवमूल्यनापेक्षां हिंदुस्थान सरकारचीं आयातीवरील नियंत्रणेंच अधिक जबाबदार आहेत. १९४९ च्या जून आणि सप्टेंबर मध्यें डॉलरभागांतून माल आणविण्याची हिंदुस्थान सरकारनें पूर्ण बंदी केली होती. नंतरच्या सहा महिन्यांत निर्यातींत घट येऊन, एप्रिल-जून या तिमाहींत आयातींत बरीच वाढ झाली आहे. याचें कारण म्हणजे १९४९ च्या अखेरीस मंजूर केलेल्या आयातीचे पदार्थ प्रत्यक्ष या सहामाहींत आले. विशेषतः अमेरिकेहून येणाऱ्या कापसापैकीं पुष्कळसा

---

१ हिंदुस्थान : परराष्ट्रीय व्यापार

प्रत्येक महिन्यास सरासरीनें ( आंकडे लाख रुपयांचे )

| कालखंड | आयात | निर्यात | तूट किंवा बचत |
|---|---|---|---|
| १९४८–४९ | ५०,२७ | ३७,७६ | – १२,५१ |
| एप्रिल-सप्टेंबर १९४९ | ५७,८५ | ३५,६२ | – २२,२३ |
| ऑक्टोबर-डिसें. १९४९ | ४७,२२ | ४८,५९ | + १,३७ |
| जानेवारी-मार्च १९५० | ३२,७३ | ४६,६८ | + १३,९५ |
| एप्रिल-जून १९५० | ४५,७० | ३३,३३ | – १२,३७ |

—'टाटा क्वॉर्टर्ली', जुलै १९५०, पृ. ४९.



अनुक्रमणिका






भाग चालू वर्षीच्या पहिल्या सहा महिन्यांतच आला. निर्यातीतील घटीचें कारण म्हणजे सुलभ-चलनांतील[२] देशांकडे कापडनिर्यातीस केलेली बंदी हेंहि असूं शकेल. त्याचप्रमाणें मार्च १९५० मध्यें आयातीवरील बंधनें सरकारनें शिथिल केल्यामुळेंहि थोडी आयात वाढली असेल. यावरून एक गोष्ट दिसून येईल आणि ती म्हणजे बंधनांच्या काढघालीमुळेंच आयात-निर्यातींत चढउतार झालेला आहे. आणि अवमूल्यनाची परिणामकारकता समजून येण्यास मार्ग नाहीं. (ऑक्टोबर १९४९ ते ऑगस्ट १९५० अखेर पुऱ्या होणाऱ्या ११ महिन्यांत हिंदुस्थानची निर्यात सुमारें १०० कोटि रु. नीं वाढली असल्याचें जाहीर झालें आहे.—'टाइम्स ऑफ इंडिया '२६-१०-५०)

## परदेशी व्यापाराची प्रादेशिक विभागणी

अवमूल्यनानंतरच्या पहिल्या सहामाहींत सुलभ-चलनांतील स्टर्लिंग गटाकडे अधिक निर्यात झाली, हें साहजिकच आहे. कारण अवमूल्यनानंतर या गटांतील देशांनीं हिंदुस्थानांतून आपला माल खरेदी करण्यास सुरुवात केली. स्वाभाविक नाहीं तें हें कीं, स्टर्लिंगगटांतून आयात मात्र वाढली नाहीं. वास्तविक दुर्लभचलनाच्या देशांतील पदार्थाऐवजीं स्टर्लिंगगटांतील देशांकडे हिंदुस्थाननें धांव घ्यावयास पाहिजे होती. परन्तु याचें कारण म्हणजे, स्टर्लिंग-गटातील देशांकडून आयात करण्यासहि बंदी होती. १९४९ मध्यें स्टर्लिंगच्या झालेल्या उधळपट्टीमुळें स्टर्लिंग व दुर्लभचलन या दोन्ही गटांतील देशातून आयात करण्यास बंदी होती (श्री. एस्. डी. देशमुख, रि. बँ. इं. बु., ऑगस्ट १९५०.). स्टर्लिंग-गटाकडे कापडी मालाची निर्यात अनपेक्षितपणें अधिक होण्याचें कारण म्हणजे हिंदी कापडाला आंतरराष्ट्रीय बाजारांत किंमतीमध्यें सवलत मिळाली. कारण परदेशांतील गिरण्या दुर्लभगटांतील देशांत होणाऱ्या कापसावर अवलंबून असल्यानें त्यांना कच्चा कापूस महाग पडे. परन्तु हिंदी गिरण्यांचा पुरवठा—जवळजवळ ३/४ इतका—हिंदी कापसानेंच होतो. आणि त्याच्या किंमती त्या प्रमाणांत न वाढल्यानें हिंदी कापडाचें उत्पादन तुलनात्मक दृष्ट्या कमी खर्चाचें होऊन, हिंदी कापडाचा उठाव अधिक झाला. तसेंच अवमूल्यनाच्या वेळीं सरकारनें कापडी सामानावरील निर्यात कर रद्द केल्यानेंहि हिंदी कापडास एक प्रकारची सवलत (Price advantage) मिळून त्याची मागणी वाढली. खुद्द इंग्लंडनें जानेवारी १९५० ते मे १९५० या पांच महिन्यांत हिंदुस्थानकडून ३९ कोटि पौंड किंमतीचा माल खरेदी केला व हिंदुस्थानकडे ३६ कोट पौंडांचा माल निर्यात केला.

गेल्या वर्षीत दुर्लभचलनांतील देशांशीं झालेल्या व्यापारांत देण्या घेण्याची बहुतेक तोंडमिळवणीच झाली आहे. याचें कारण म्हणजे एक तर डॉलर आयात बंद केली होती. व डॉलरखर्चावर मागील वर्षांतील डॉलरखर्चाच्या शें. ७५ टक्केच डॉलर खर्च करावयाचे असें हिंदुस्थानवर आंतरराष्ट्रीय द्रव्यनिधीचें बंधन होतें. खुद्द अमेरिकेशीं ऑगस्ट १९४९ ते मे १९५० अखेर दहा महिन्यांत झालेल्या व्यापारांत हिंदुस्थानची आयात ७५.५ कोटि रुपयांची झाली व निर्यात ७३.९ कोटि रु.ची झाली. अशा रीतीनें १.६ कोटि रुपयांची किरकोळ तूट आली आहे. अशा तऱ्हेनें जी तोंडमिळवणी झालेली दिसत आहे ती, धान्य-आयात—धान्य आवश्यक असतांहि—डॉलर भागांतून जवळजवळ बंद केल्यामुळें व सरकारी डॉलरखर्चावर कडक नियंत्रण

---

२ **सुलभ-चलन-विभाग** (Soft Currency Area) : ज्या देशांचें चलन मिळण्यास सुलभ आहे असे देश. या विभागांत स्टर्लिंग गट व मध्यम चलन गटांतील देशांचा समावेश होतो. **दुर्लभ-चलन-विभाग** (Hard Currency Area) : ज्या देशांचें चलन मिळण्यास कठिण आहे असे देश म्हणजेच सर्वसाधारणपणें ज्या देशांशीं सालोसाल तुटीचा व्यापार चालू आहे. या गटांत मुख्यत्वें डॉलर विभागगट व स्विट्झर्लंड आदीकरून इतर दुर्लभ-चलन-गटांतील देशांचा समावेश होतो. **इतर विभाग** : वरील दोन्ही विभाग वगळून राहिलेले देश.

घातल्यानें-च, शक्य झाली आहे. यापुढील कालखंडांत, आयातनियंत्रणें शिथिल होण्याचा संभव आहे. आणि ज्यूट-निर्यातींत जर अपेक्षेप्रमाणें वाढ झाली नाहीं तर; डॉलर देण्याघेण्याची तोंडमिळवणी होणें कठिण दिसतें.

वरील दोन गट वगळ्यास जे प्रदेश राहतात त्यांना इतर प्रदेश ( other areas ) असें संबोधण्यांत येतें. या प्रदेशांशीं झालेल्या व्यापारावर अवमूल्यनाचा फारसा परिणाम झालेला नाहीं. कारण त्यांचेकडे निर्यात होणारा मुख्य पदार्थ म्हणजे पोतीं हा होय. व त्याची निर्यात आगाऊ करारान्वयेंच ठरलेली असल्यानें तींत वाढ होणें शक्य नव्हतें. ईजिप्त, सयाम व इटली या तीन देशांकडून हिंदुस्थान अनुक्रमें लांब धाग्याचा कापूस व सूत, तांदूळ, व कापूस, लोंकर व लोंकरी सामान आयात करतो.[३]

अवमूल्यनापूर्वी व अवमूल्यनानंतर कांहीं ठळक पदार्थांची निर्यात कशी झाली हें खालील कोष्टकावरून कळून येईल :

हिंदुस्थान : कांहीं विशिष्ट पदार्थांची निर्यात
( आंकडे कोटी रुपयांचे )

| पदार्थ | ऑक्टो०-ऑगस्ट १९४८–४९ | ऑक्टो०-ऑगस्ट १९४९–५० |
|---|---|---|
| कच्चा ज्यूट | १७·०३ | ८·२२ |
| ज्यूट तयार माल | १२२·८१ | ११३·५० |
| कच्चा कापूस | ८·९ | ८·५६ |
| कापडसामान | २८·६७ | ७४·७६ |
| इतर कापडी तयार माल | ४·०६ | १८·०३ |
| मसाले | ९·२७ | १८·४६ |
| चहा | ६१·०७ | ६१·६१ |
| तंबाखू | ८·८२ | १३·३४ |
| पारा | ४·४७ | ८·८० |
| लाख | ६·८५ | ८·०५ |
| कच्चीं कांतडीं | ५·२६ | ६·५२ |
| कमावलेलीं कांतडीं | ११·८१ | २१·१९ |
| मँगनीज | २·८८ | ५·९५ |
| भुईमूग बीं. | ३·७० | ७·३९ |
| रद्दी कापूस | ५·३६ | ९·०६ |

( 'टाइम्स् ऑफ् इंडिया'–२६-१०-१९५०वरून )

त्यांतील आंकड्यावरून हें स्पष्ट होतें कीं कातडीं, गळिताचीं धान्यें, मसाले, व कापडी सामान ( Cotton piecegoods ) यांत अवमूल्यनानंतर विशेष वाढ झाली आहे. कापडी सामानाच्या निर्यातीचें कारण म्हणजे हिंदुस्थानी कापडाची कमी किंमत हेंच होय. इतर वाढलेल्या निर्याती अवमूल्यनानंतर फार काळ टिकल्या नाहींत. ज्यूटची निर्यात वाढूं शकली नाहीं याचें कारण कच्चा ज्यूट पाकिस्तानांतून येतो, व त्याचा पुरवठा भरपूर प्रमाणांत होऊं शकला नाहीं. लाखेच्या पदार्थांच्या निर्यातींतहि वाढ झालेली आहे. कांतड्याच्या निर्यातीच्या वाढीचें कारण म्हणजे पाकिस्तानी मालापेक्षां हिंदी मालाच्या कमी किंमती हेंच होय.

### अवमूल्यन व पाकिस्तान

अवमूल्यनाच्या धोरणावर हिंद-पाक संबंधांचे फार महत्त्वाचे परिणाम होत असल्यानें पाकिस्तान-बरोबर झालेल्या किंवा न झालेल्या व्यापाराचा विचार स्वतंत्रपणें करण्याचें ठरविलें आहे. या दोन शेजाऱ्यांचे राजकीय मतभेद कितीहि असोत, त्यांच्यातील आर्थिक बेबनाव अवमूल्यनाच्या प्रश्नापासूनच वाढत गेला. स्टर्लिंग गटांतील पाकिस्तान या एका देशानेंच स्टर्लिंगनंतर आपल्या चलनाचें अवमूल्यन करावयाचें नाकारलें व आपल्या रुपयाचा डॉलरशीं दर पूर्वीचाच कायम ठेवला. अर्थात् हिंदी रुपया व पाकिस्तानी रुपया यांमध्यें नवा दर ( पाकिस्तानी १००रु = हिंदी १४४ रु. ) प्रस्थापित झाल्याचें 'स्टेट बँक ऑफ् पाकिस्तान'नें जाहीर केलें, हें हिंदला

३ १९४९–५० मध्यें हिंदुस्थाननें सयाममधून सुमारें १० कोटी रु. चें धान्य, ईजिप्तमधून ३४ कोटी रु. चा कापूस व ४ कोटी रु. चें धान्य व इटलीमधून ९ कोटी रु. चा कापडी व लोंकरी माल खरेदी केला. ( 'इंडियन ट्रेड जर्नल', १७ ऑगस्ट १९५०. पुरवणी. ) लांब धाग्याचा कापूस व अन्नधान्यें यांत आपण जोंपर्यंत स्वयंपूर्ण नाहीं तोंपर्यंत आपलें बरेंच परराष्ट्रीय चलन यांत खर्च होणार.








मान्य झालें नाहीं. कारण त्यामुळें पाकिस्तानी माल हिंदला महाग पडणार असून त्यामुळें हिंद-पाक-मध्यें देवघेवी-( Barter ) च्या करारावर हिंदच्या दृष्टीनें विपरीत परिणाम होत होता. डॉ. जॉन मथाई यांनीं संसदेंत असा विश्वास प्रकट केला होता कीं, "पाकिस्तानाला आपल्या चलनाचें अवमूल्यन करावेंच लागेल. कारण हा नवा दर कृत्रिम आहे. पाकिस्तानी रुपयाची वाजवी किंमत जवळजवळ हिंदी रुपयाइतकीच आहे." यामुळें चिडून जाऊन-च कीं काय पाकिस्तानानें अवमूल्यन न करण्याचें ठरविलें. याचा परिणाम असा झाला कीं, नोव्हेंबर १९४९ ते एप्रिल १९५० पर्यंत हिंद-पाक व्यापार पूर्णपणें बंद झाला ! कारण ज्यूट व गहूं वगैरे पाकिस्तानी माल नव्या हुंडणावळीच्या दरानें घेणें हिंदला मान्य नव्हतें. पण त्यामुळें पूर्व पाकिस्तानांतील गरीब शेतकऱ्यांचें अपरंपार नुकसान झालें. कच्च्या ज्यूटचा उठाव होईना. भाव ३५ रु. मणापासून घसरत जाऊन १२ रु. मणापर्यंत आले ! शेवटीं हिंदी गिरण्या बंद पडण्याची वेळ आल्यानें एप्रिलमध्यें हिंदनें पाककडून ४० लाख मण ज्यूट खरेदी करण्याचें ठरविल्यानें पाकला ऐन वेळीं दैवानें हात दिला. हिंदुस्थानांत या करारावर खूपच टीका झाली. कारण पाकिस्तानानें जरी पूर्वीपेक्षां कमी भावानें ज्यूट देऊं केला होता, तरी पाकिस्तानांत चालू असलेल्या भावापेक्षां तो बराच अधिक होता. हा करार ३० सप्टेंबर रोजीं संपला. व पाकनें अद्याप अवमूल्यन केलें नसल्यानें हिंदुस्थाननें तो पुढें वाढविण्यास नकार दिला.

पाकिस्तानी रुपयाच्या दराचा प्रश्न सध्यां आंतरराष्ट्रीय द्रव्यनिधी-( I. M. F. )कडे निर्णयासाठीं गेला आहे. निधि ठरवील तो दर पाकिस्ताननें मान्य केल्यासच पाकला निधीचें सदस्यत्व मिळेल. पाकिस्तानी रुपयाचा दर, हिंदइतका नाहीं, तरी कांहीं प्रमाणांत निधि घटवील अशी किंवदन्ती आहे. मात्र अद्याप अधिकृत घोषणा कांहींच झालेली नाहीं.

अवमूल्यन न करण्यानें पाकिस्तानचा फायदा झाला कीं तोटा ? खालील[४] कोष्टकांत याचें थोडेंफार उत्तर सांपडेल.

गेल्या वर्षांत जगांतील सर्व देशांशीं व प्रमुख देशांशीं झालेल्या व्यापारांत पाकिस्तान घेणेकऱ्याचा देणेंकरी होऊन बसला आहे. अमेरिकेकडून येणें होतें त्याचें ७ पटीनीं आतां देणें झालें आहे ! हिंद-पाक व्यापारावर तर हिंदच्या दृष्टीनें इष्ट व पाकिस्तानच्या दृष्टीनें अनिष्ट असा परिणाम झाला आहे. आणि याला अवमूल्यन न करण्याचा पाकचा हट्टच जबाबदार आहे. १९४८-४९ मध्यें एकूण पाकिस्तानी आयातीपैकीं ५४% इतकी आयात हिंदनें पुरविली होती. पण १९४९-५० मधील हा आंकडा अवघा ३१% च आहे. १९४८-४९ मध्यें एकूण पाकिस्तानी निर्यातीपैकीं ६२% भाग हिंदनें उचलला होता; १९४९-५० मध्यें हें प्रमाण अवघ्या ३५% वर आलें ! याचा परिणाम असा झाला कीं,

---

४ पाकिस्तानचा परदेशांशीं व्यापार : १९४८–४९ ते १९४९–५०

[ आंकडे लाख रुपयांचे ]

| देश | १९४८–१९४९ | | | १९४९–१९५० | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | आयात | निर्यात | बाकी | आयात | निर्यात | बाकी |
| हिंदुस्थान | ७५३३ | १०६६४ | +३१३१ | ४२८५ | ३९१९ | – ३६६ |
| ग्रेट ब्रिटन | २७०१ | १४८५ | –१२१७ | ३४७७ | १८८९ | –१५८८ |
| अमेरिका | ७९६ | ८८१ | + ८५ | ११९७ | ६४३ | – ५५४ |
| जपान | ९९ | ११६ | + १७ | ९४१ | ५३५ | – ४०६ |
| सर्व देश | १३९७६ | १७०७१ | +३०९५ | १३७२४ | ११३३८ | –२३८६ |

—[ 'रिझर्व्ह बँक ऑफ् इंडिया' बुलेटिन—जून १९५०, पृ. ३९५ ]










१९४८-४९ मध्यें पाकचें हिंद सुमारें ३१ कोट रु. देणें लागत होता; तेथें १९४९-५० मध्यें पाकच हिंदचा देणेंकरी (सुमारें ३·६६ कोट रु. रकमेचाच का होईना) होऊन बसला आहे!

तेव्हां अवमूल्यन न करण्याचें धोरण पाकिस्तानला फारसें मानवलेलें दिसत नाहीं. पाक अर्थमंत्री अट्टहासानें सांगतात कीं, अवमूल्यन न करण्यांत पाकचें हित आहे! पण तें कसें हें त्यांनीं अद्यापि गुपितच ठेवलें आहे! आणि आतां हा एक प्रतिष्ठेचा प्रश्न होऊन बसला आहे. ता. ४ ऑक्टोबर रोजीं ज्यूट-प्रश्नावरील चर्चेस उत्तर देतांना पूर्व बंगालचे मुख्यमंत्री श्री. नुरुल अमीन यांनीं सांगितलें कीं, "ज्यूट करणाऱ्या शेतकऱ्यांना योग्य किंमत मिळत नाहीं हें खरें आहे. पण अवमूल्यन न करण्याचें ठरविणाऱ्या आपल्या सरकारचा मान राखण्याकरितां स्वार्थत्याग करण्याची जरूरी आहे, याची त्यांना जाणीव आहे." ('टाइम्स ऑफ इंडिया', ऑक्टोबर ५, १९५०, पृ. ५). आर्थिक प्रश्नांत राजकारण घुसलें कीं खरा स्वार्थसुद्धां बाजूला राहतो!

## अवमूल्यन व किंमतीचें मान

चलनाचें अवमूल्यन करणाऱ्या देशांतील किंमतीचें मान वाढावयाचा संभव असतो. कारण बाह्य किंमत उतरविली असल्यानें, अंतर्गत किंमतीवरहि त्याचा परिणाम होतो. शिवाय निर्यात वाढून आयात कमी होऊन वस्तूंच्या तुटवड्यामुळेंहि किंमतीचें मान वाढतें. अवमूल्यनाच्या अनेक धोक्यांपैकीं हा एक धोका आहे. आणि इतर फायद्यांवर नजर ठेवून आपण हा धोका पत्करिला होता. शिवाय हिंदी परिस्थितींत हा धोका फारसा नव्हता. सरकारनें काढलेल्या पत्रकांत असें म्हटलें होतें कीं, "या देशांत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांच्या किंमतींवर अवमूल्यनाचा कांहींहि परिणाम होणार नाहीं. आणि राहणीच्या खर्चाचे दर्शक तयार करण्यांत मुख्यत्वें या गोष्टींचाच उपयोग करण्यांत येत असल्यानें तो दर्शक वाढलेला दिसणार नाहीं. धान्याची आयातच बंद होणार असल्यानें डॉलरभागांतील महागाईचें धान्य येऊन किंमती वाढणार नाहींत. तसेंच स्टर्लिंग-रुपया दर कायम असल्यानें स्टर्लिंग मालाच्या किंमतीहि वाढण्याचें कारण नाहीं." या बाबतींत घाऊक किंमतींच्या दर्शकांचें जें कोष्टक प्रसिद्ध झालें आहे, तें पाहिलें असतां असें दिसतें कीं, सप्टेंबर ४९ ते एप्रिल ५०' पर्यंत सर्वसाधारण किंमतीचा दर्शक साधारणपणें स्थिर राहिला आहे. मात्र मे महिन्यापासून वाढ सुरू होऊन जुलैअखेर तो १४ नीं वाढला आहे. या वाढीस मुख्यतः अन्नधान्यें व संकीर्ण पदार्थ (उदा० वनस्पति वगैरे) यांची वाढच जबाबदार आहे. पहिल्या सहामाहींतील स्थिरता ही सरकारच्या कडक नियंत्रणाचें फळ आहे; तर पुढची वाढ म्हणजे सरकारी असहायतेची निदर्शक आहे. मुख्य अडचण म्हणजे पुरवठ्याचीच आहे. वैयक्तिक उपयोगाच्या, तसेंच औद्योगिक जरूरीच्या, प्रत्येक गोष्टीचीच चणचण भासूं लागली आहे. आणि त्यामुळें मागणी तीव्र नसतांही किंमती वाढत आहेत, हा एक प्रकारें अवमूल्यनाचाच अप्रत्यक्ष परिणाम आहे. कारण, कापड व कापडी सामान, गळिताचीं धान्यें, मसाले यांची निर्यात व मागणी वाढली. त्यामुळें हिंदी लोकांनाच त्यांचा पुरवठा अपुरा पडूं लागला व किंमती भराभर वाढल्या. याच्या उलट, सूत व कापडी सामानाच्या आयातीच्या किंमतीचा दर्शक मे १९४९ ते मे १९५० मध्यें ५६५.४ पासून ११५४.६ पर्यंत चढला आहे. त्यामुळेंहि किंमती वाढण्यास मदत झाली. अन्नधान्याची आयात घटली असली तरी आयातीची किंमत ३७९ पासून ५०९ पर्यंत चढली आहे! मसाल्याची निर्यात जरी प्रत्यक्ष कमी झाली असली तरी त्याच्या निर्यातीच्या किंमतीचा दर्शक मे १९४९ ते मे १९५० पर्यंतच्या एक वर्षांत ९९० पासून २१३४ पर्यंत म्हणजे ११४४ नीं चढला! अर्थातच या निर्यातीच्या किंमतीचा अंतर्गत बाजारावर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. मात्र या सर्व किंमतवाढीचा संबंध—फार तर अन्नधान्याच्या किंमतवाढीखेरीज—प्रत्यक्ष अवमूल्यनाशीं जोडणें कठिण आहे. याच्या उलट कापडी सामानाच्या निर्यातीची किंमत कमी होऊन एकंदर निर्यात मात्र वाढली आहे, ती अवमूल्यनामुळेंच म्हटली पाहिजे.

एकंदरीनें पाहतां हिंदुस्थानांतील किंमतवाढ नैसर्गिक संपत्तीच्या तुटवड्यामुळें झाली आहे.












अवमूल्यनामुळें हा तुटवडा अधिक स्पष्ट झाला. व त्याचें पर्यवसान म्हणजे सप्टेंबर १९४९ पासून जुलै १९५० पर्यंत किंमतीचा दर्शक १५ ते २० आंकड्यांनीं चढला आहे. व अद्यापि चढतच आहे. कोरियन युद्धामुळें लोकांचा स्वार्थसाधूपणा स्वच्छंदपणें मोकाट सुटला; व श्री. चिंतामण देशमुख यांनीं संसदेंत सांगितल्याप्रमाणें 'या किंमतवाढीला जीं अनेक कारणें आहेत त्यांत सट्टेबाजी, सांठेबाजी व काळा बाजार' हीं महत्त्वाचीं आहेत. सारांश, अवमूल्यनानंतर किंमतवाढ झाली आहे; परन्तु ती अवमूल्यनाचा एक प्रत्यक्ष परिणाम म्हणतां येणार नाहीं. हिंदी नैसर्गिक साधनांचा अपुरेपणा, आंतरराष्ट्रीय बेबनाव व आपल्या लोकांचा, विशेषतः कारखानदार व व्यापारी लोकांचा, स्वार्थसाधूपणा यांचा तो एकत्रित परिपाक म्हटला पाहिजे.

### राहणीचें मान [ Cost of Living ]

राहणीच्या मानाचे दर्शक करण्याच्या विशिष्ट पद्धती आहेत व त्यामुळें प्रत्यक्ष दर्शक व परिस्थिति यांचा कित्येक वेळां मेळच बसत नाहीं. पदार्थांची निवड, तुलनेचा काल, स्वीकारलेलीं गुणकें (Weights) या सर्वांवर राहणीच्या मानाचा दर्शक अवलंबून असतो. त्यामुळें कित्येकदां सर्वसाधारण किंमतीचें मान भरमसाट वाढलें असलें तरी राहणीच्या मानाचा दर्शक प्रायः स्थिरच वाटतो.[५]

ही वस्तुस्थिति मनांत ठेवून राहणीच्या मानाच्या दर्शकांकडे पाहिलें[६] तर सरकारचा आशावाद बराच खरा ठरला, आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण मुंबईच्या दर्शकांत सप्टेंबर ते मे या ९ महिन्यांत ६ चीच वाढ झालेली दिसत आहे. त्याचें कारण मुख्य म्हणजे अन्नधान्य, कापड, व घरभाडें ह्या गोष्टी नियंत्रित आहेत. आणि कोरियन युद्धामुळें झालेल्या अकारण व आकस्मिक वाढीचें प्रतिबिंब या दर्शकांत पडलेलें दिसत नाहीं. तेव्हां अवमूल्यनाचा विशेष अनिष्ट परिणाम राहणीच्या मानावर झालेला दिसत नाहीं, एवढेंच आपणांस म्हणतां येईल. मात्र हें विधान अति मर्यादित स्वरूपाचें आहे हें सांगणें नकोच.

### स्टर्लिंग ठेव व दुर्लभ चलन

आपली स्टर्लिंगमधील ठेव व दुर्लभचलनाची परिस्थिति यांवर अवमूल्यनाचा कांहीं परिणाम झाला आहे कीं काय, हें पाहणें उपयुक्त ठरेल. १९५० च्या पहिल्या तिमाहीच्या अखेरपर्यंत पुऱ्या झालेल्या वर्षांत स्टर्लिंग गटाकडे हिंदुस्थानचें सुमारें २८ कोटि रु. चें येणें निघत होतें. त्यामुळें इंग्लंडशीं झालेल्या आर्थिक करारामुळें स्टर्लिंग पुंजींतून जे

---

५. जिज्ञासूंनीं २८ जुलै १९५० च्या 'ईस्टर्न इकॉनॉमिस्ट'मधील "Prices and Cost of Living" (पृ. १३६) हा माहितीपूर्ण लेख पहावा.

६ हिंदुस्थान : राहणीच्या मानाचे दर्शक

| | मुंबई जून | मुंबई ऑगस्ट | अहमदाबाद जुलै | अहमदाबाद ऑगस्ट | नागपूर जानेवारी | नागपूर ऑगस्ट |
|---|---|---|---|---|---|---|
| तुलनेचें वर्ष : | १९३४ | १९३९ | १९२७ | १९३९ | १९२७ | १९३९ |
| १९४८ सरासरी | ३०३ | २९१ | २४३ | ३४२ | २३७ | ३८९ |
| १९४९ सरासरी | ३०७ | २९५ | २४८ | ३५० | २४० | ३९३ |
| १९४९ जून | ३०० | २८८ | २४८ | ३५० | २४१ | ३९५ |
| ,, सप्टेंबर | ३०६ | २९४ | २५२ | ३५५ | २४३ | ३९८ |
| ,, डिसेंबर | ३०८ | २९६ | २४९ | ३५१ | २३३ | ३८२ |
| १९५० मार्च | ३०२ | २९० | २६० | ३६६ | २३३ | ३८२ |
| ,, मे | ३१२ | ३०० | २६५ | ३७३ | ... | ... |



अनुक्रमणिका






दोन हप्त्यांनीं एकून १० कोटी पौंड मिळावयाचे होते ते आपण काढलेच नाहींत. किंबहुना १९४९ च्या तिसऱ्या तिमाहींत झालेली तूट भरून काढण्या-करितां जरी कांहीं रक्कम वापरली तरी पुढें झालेल्या आवकीमुळें या आर्थिक वर्षाच्या सुरुवातीला हिंदु-स्थानाजवळ १० कोटी पौंडांपेक्षांहि अधिक रक्कम असणें संभवनीय आहे.

दुर्लभ-चलन-गटाशीं झालेल्या व्यापारांतहि हिंदु-स्थानाची जवळ जवळ तोंडमिळवणी झालेलीच आहे. त्यामुळें डॉलरखर्चाकरितां केंद्रिय निधीकडे मागणी करण्याचें कारणच पडलेलें नाहीं.

अशा रीतीनें, योगायोगानें म्हणा किंवा अव-मूल्यनामुळें स्टर्लिंगगटांत कापडाची झालेली निर्यात व अमेरिकेकडे ज्यूट व इतर कच्च्या मालाची निर्यात यामुळें म्हणा, चालू वर्षीं परदेशी चलना-बाबतची परिस्थिति थोडीफार समाधानाची आहे, असें मानावयास जागा आहे. मात्र जून १९५० पासून किंचित् तूट येऊं लागली आहे, हें डोळ्याआड करून चालणार नाहीं.

### अवमूल्यन व उत्पादनक्षमता

अवमूल्यनामुळें निर्यात वाढून त्या धंद्यांचें उत्पा-दन वाढणें आवश्यक होतें. परन्तु, प्रत्यक्षांत मात्र, कापड-निर्यात वाढून सुद्धां, त्या धंद्याच्या उत्पाद-नाचा दर्शक डिसेंबर १९४९ ते मे १९५० च्या ६ महिन्यांत १०२ पासून ९२ पर्यंत घसरला आहे. ज्यूट धंद्याचा दर्शक डिसेंबर १९४९ मध्यें सर्वांत अधिक म्हणजे ८३ होता तो एप्रिल १९५० मध्यें ४१ झाला व आतां पुन्हां ७८ पर्यंत जूनमध्यें चढला आहे. याचा अर्थ असा कीं, उत्पादनवाढ ही अवमूल्यनावर अवलंबून नसून, भांडवल व कच्चा माल यांच्या सतत व भरपूर पुरवठ्यावरहि तित-कीच अवलंबून आहे. उत्पानक्षमता वाढावयास धंद्यांतील उत्पादनाचा खर्च ( cost ) व किंमत ( price ) यांचेंहि परस्परनातें विशिष्ट व स्थिर ठेवावें लागतें. हिंदुस्थानांत आवश्यक वस्तूंचा तुटवडा असल्यानें किंमती वाढतात, राहणीचें मान वाढतें, धंद्याचा खर्च वाढतो, हे खर्च व किंमत यांचें नातें स्थिर राहत नाहीं. व आंतरराष्ट्रीय स्पर्धेत आपल्या सतत महाग होणाऱ्या वस्तूंचा निभाव लागत नाहीं.

### निष्कर्ष :

सुरुवातीस म्हटलेंच आहे कीं, चलनाचें अव-मूल्यन हा एक तुटीच्या व्यापारावरील तोडगा आहे. त्याचें यशापयश नैसर्गिक संपत्ति, तिची उपयोग-क्षमता ( Elasticity ), नियंत्रणांचें यश व आंतर-राष्ट्रीय समझोता वगैरे अनेक मानवाधीन व दैवाधीन गोष्टींवर अवलंबून असतें. ज्या प्रमाणांत या गोष्टी साध्य असतील त्या प्रमाणांतच अव-मूल्यनाची फलश्रुति व्हावयाची. मात्र नैसर्गिक संप-त्तीच जर मर्यादित असली अगर उपयोगक्षम नसली, लोकांची मनोवृत्ति नियंत्रणविरोधी असली, तर नुसत्या अवमूल्यनामुळें मूलभूत दोष जाऊन निर्यात वाढणार नाहीं. हिंदी अवमूल्यनाच्या प्रयोगानें हेंच सिद्ध केलें आहे. हिंदी अवमूल्यनाचें एक वर्षांतील यश फारसें स्पृहणीय आहे असें म्हणतां येणार नाहीं. आठ-नऊ महिन्यांचा काळ उलटल्यानंतर आंतर-राष्ट्रीय व्यापारांतील फायदा कमी झाला, नव्हे कांहीं ठिकाणीं तूट आली, किंमती वाढल्या, उत्पादन घटलें; सर्वच अपेक्षेच्या विरुद्ध झालें. अर्थात् याचें कारण सरकारची निष्क्रियता किंवा चुकीचें धोरण असेंच कांहीं म्हणतां येणार नाहीं. पाकिस्तानचा अनपेक्षित असहकार, बिघडलेली आंतरराष्ट्रीय परिस्थिति, कोरियन युद्ध व हिंदुस्थानवर झालेले आधिभौतिक प्रकोप या कांहींशा दैवाधीन व नि-यंत्रणातीत गोष्टींवरहि या अपयशाचें खापर फोडावें लागेल. एका बाबतींत सरकारला जबाबदार धरावें लागेल, आणि ती म्हणजे नियंत्रणाची शिथिल अम्मलबजावणी. परन्तु यास सरकारइतकी जनता-हि जबाबदार आहे. अवमूल्यनानंतरच्या पहिल्या सहामाहींत सरकारनें किंमती काबूंत राखल्या. त्याच कालखंडांत निर्यातहि वाढली व तूट कमी झाली. तेथपर्यंत अवमूल्यन यशस्वी झालें असं वाटतें न वाटतें तोंच आंतरराष्ट्रीय व दैवाधीन गोष्टींनीं तें यश हिरावून नेलें !

आज परिस्थिति अशी आहे कीं, आंतरराष्ट्रीय व्यापारात हिंदुस्थानला होत असलेला फायदा नष्ट होऊं पाहत आहे. किंमती वाढत आहेत व उत्पादन घटत आहे. अशा वेळीं, गेल्या वर्षीं व्यापारांत मिळालेल्या चलनामुळें भुलून जाऊन, कारखान-








दारांच्या कचकचीमुळें, सरकार आयातीवरील नियंत्रणें अधिक सैल करील कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. त्याचप्रमाणें आधिभौतिक प्रकोपांमुळें सरकारला आपली धान्याच्या आयातीची मर्यादा वाढवावी लागून सुमारें २५ लाख टन धान्य आणावें लागणार आहे, व त्यांत १०० कोट रुपये खर्चीं पडणार आहेत. यावेळीं सरकारनें नियंत्रणें कडक करून कसोशीनें अमलांत आणलीं पाहिजेत. त्या दृष्टीनें सांठेबाज व काळाबाजार करणाऱ्या लोकांना विनाचौकशी अटकेंत ठेवण्याचे अधिकार सरकारनें घेतले हें ठीकच झालें. अन्नधान्यांतील स्वयंपूर्णता ही एक दूरचें साध्य न राहतां तावडतोब हस्तसाध्य झाली, तरच अवमूल्यनाच्या उपायाला इष्ट परिस्थिति लाभेल. त्या दृष्टीनें अन्नोत्पादनाच्या कामीं सरकारनें पोलाद व सीमेंट मिळणें सोपें केलें आहे हें इष्टच झालें. त्याचप्रमाणें ज्यूट व लांब धाग्याचा कापूस यांचीही तरतूद हिंदुस्थाननें केली तरच बरेंच दुर्लभचलन वांचेल. शिवाय राजकीय कारणास्तव कां होईना, पाकिस्तानी सहकार्यावर हिंदुस्थाननें आपल्या कोणत्याहि योजना आंखतां कामा नयेत. किंमतवाढीचा प्रश्न तांतडीनें सोडवावयास पाहिजे. तेवढ्याकरितां सरकारी खर्चांत बचत व्हावयास पाहिजे. सरकार या प्रश्नाकडे बुद्धिपुरस्सर, राजकीय कारणांसाठीं, दुर्लक्ष करीत आहे कीं काय, असा संशय लोकांना आल्याखेरीज राहणार नाहीं.

गेल्या ऑगस्टमध्यें भारताचे अर्थमंत्रि श्री. चिंतामण देशमुख यांनीं अवमूल्यनानंतरची दुसरी आठ कलमी योजना संसदेपुढें मांडली. त्यांत ( १ ) चलनवाढीला आळा घालण्याकरितां योग्य असें आर्थिक धोरण अवलंबिणें, ( २ ) काटकसर करणें ( ३ ) शेजारी राष्ट्रांशीं मित्रत्वाचें नातें नसल्यानें राष्ट्रीय आर्थिक परिस्थितीवर जो ताण पडतो तो कमीकरण्याची कोशीस करणें, ( ४ ) अन्नधान्यें, कापूस व ताग यांमध्यें स्वयंपूर्णता आणण्याचा हेतुपुरस्सर प्रयत्न करणें, ( ५ ) औद्योगिक उत्पादन वाढविणें, ( ६ ) ग्रामीण भागांतील बेकारी कमी करणें, ( ७ ) किंमतवाढीकडे डोळ्यांत तेल घालून लक्ष ठेवणें व किंमती काबूंत ठेवण्यासाठीं सर्व सरकारी शक्तीचा उपयोग करणें आणि ( ८ ) देशाच्या मर्यादित संपत्तीचा नियोजनपूर्वक, सर्वांत अधिक फायदेशीर बाबींसाठीं, उपयोग करणें—ही योजना अर्थमंत्र्यांनीं मांडली तें इष्टच आहे. पण सरकारजवळ योजनांना तुटवडा नाहीं; त्यांच्या अम्मलबजावणीचा आहे, ही लोकांची झालेली समजूत या नव्या योजनेच्या प्रस्तावामुळें जाणार नाहीं. प्राप्त परिस्थितींतील दोष नष्ट करण्यास वरील योजना इष्ट आहे व तिची अम्मलबजावणी झाल्यास रुपयाच्या अवमूल्यनापासूनचे जे कायम स्वरूपाचे फायदे आहेत—कापड व ज्यूट निर्यात—ते साध्य होतील. तोंपर्यंत अवमूल्यनाची फलश्रुति ही एक विफल—स्मृतिच राहणार !

---

## थट्टेखोरपणामागें गंभीर शहाणपण

वयाच्या ९४ व्या वर्षीं शॉ निघून गेले, म्हणून त्यांच्याबद्दल शोक तो काय करायचा ? परंतु आपणां सर्वांच्या वैयक्तिक विचारांशीं आणि आपल्या या युगांतील मानासिक वातावरणा-( mental climate )-शीं शॉ इतके एकजीव होऊन गेले कीं, त्यांचा मृत्यु हा आपणां सर्वांना एक धक्काच आहे ! ते आधुनिक युगांतील एक महान् विभूति होते. असंख्य माणसांच्या विचारांवर, गेल्या दोन पिढ्या, त्यांनीं परिणाम घडवून आणला आहे. त्यांच्या थट्टेखोर आणि खेळकर वृत्तीमागें गंभीर शहाणपण दडलें होतें. शहाणपणाची लोकांकडून बूज होत नाहीं याची कट्ट जाणीवहि त्यांच्या त्या थट्टेखोरपणामागें होती. त्यांच्याबरोबर लोकहि हंसत असत आणि त्यांच्या कलाकृती लोकांना आवडतहि असत. परंतु त्यांच्या लेखनांतील गंभीर आशयाकडे लक्ष देणारे फारच थोडे.

—श्री. जवाहरलाल नेहरू २।११।५०.








श्री. वसंत वरखेडकर

# पुन्हां एकदां कला आणि नीति

'नवभारत 'च्या ऑगस्ट १९५० च्या अंकांत प्राध्यापक श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांचा 'कला व नीति' या नांवाचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. हा लेख वाचावयाला प्रारंभ केल्याबरोबर त्यांतील अत्यंत कुशल युक्तिवादानें व प्रतिपाद्य विषयाला उठाव आणणाऱ्या एकापेक्षां एक सरस व समर्पक दृष्टान्तांनीं मन गुंग होऊन गेलें. विषय शिळाच, त्यावर अनेक विद्वानांनीं भिन्न भिन्न दृष्टिकोनांतून विचार आधींच प्रकट केलेले; तरीहि श्री. वऱ्हाडपांडे यांचें विवेचन ताजें व तल्लीन करणारें वाटल्यावांचून राहिलें नाहीं. त्यांचा बुद्धिवादाचा ओघ इतका संथ होता कीं त्याबरोबर वाहत जातांना, क्षणकाल देखील, एखाद्या विशिष्ट मुद्द्याबद्दल मतभेद असेल असें वाटलें नाहीं. पण संपूर्ण लेख वाचल्यावर व श्री. वऱ्हाडपांडे यांचा सिद्धान्त पूर्णतया स्वीकृत केल्यावर कला व नीति यांच्या अन्योन्य संबंधाबद्दलचे अनेक प्रश्न त्याच्या अनुषंगानें सोडविण्याचा प्रयत्न करूं लागलों, तेव्हां मात्र सिद्धान्तांतील अपुरेपणा व एकांगीपणा प्रत्ययाला आल्यावांचून राहिला नाहीं.

श्री. वऱ्हाडपांडे यांनीं नीतीचें सार औचित्यांत असल्याचें प्रतिपादिलें आहे आणि कलेचें संवादित्वांत व सुसंगतींत. त्याचप्रमाणें त्यांनीं नीति हेंहि सौंदर्यसिद्धीचें एक साधन आहे व कलाहि सौंदर्य-सिद्धीचें साधन आहे असें मांडलें आहे. औचित्य आणि संवादित्व किंवा सुसंगति यांत साधर्म्य असल्याचें दाखवून श्री. वऱ्हाडपांडे यांनीं कला व नीति यांतील व्यवच्छेदक लक्षण शोधून काढलें आणि उभयतांचें साध्य कसें एक आहे हेंहि दाखविलें. येवढें केल्यावर अर्थातच कला व नीति यांत विरोध किंवा वैर नाहीं तर दोन्ही परस्परपूरक आहेत हें आपोआपच सिद्ध होतें, असें श्री. वऱ्हाडपांडे यांनीं दाखविलें आहे.

श्री. वऱ्हाडपांडे यांचें प्रतिपादन थोडक्यांत वर दिल्याप्रमाणें आहे. आतां या सर्व प्रतिपादनांत अपुरेपणा व एकांगीपणा कसा आहे तें पाहूं. नीतीचें सार औचित्यांत आहे हें कबूल. पण औचित्याला निश्चित अशी कांहीं व्याख्या आहे काय? श्री. वऱ्हाडपांडे यांनीं हा मुद्दा उपेक्षिला आहे. औचित्या-ची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला कीं त्यांतील पोकळ वासा अधिकाधिक दिसूं लागतो. औचित्याची धारणा निरर्थक आहे, असें मी म्हणत नाहीं. ती इतकी सापेक्ष आहे, निदान कांहीं विशिष्ट रूढ बौद्धिक भ्रमामुळें इतकी सापेक्ष झालेली आहे कीं, तिचें स्वरूप व्यक्तिपरत्वें भिन्न आढळतें; नव्हे परस्पर-विरोधीहि आढळतें. तसाच प्रकार कलाकृतींतील संवादित्वासंबंधीं किंवा सुसंगतीसंबंधींहि आढळतो. नृत्य, संगीत, क्रीडा किंवा अन्य कोणताहि कला-प्रकार घ्या, त्यांतील संवादित्व, अगर सुसंगति सदा, सर्वकाळीं, कोणत्याहि स्थळीं, कशाहि मनः-स्थितींत सारखीच प्रत्ययास येत नाहीं. शिवाय एकाच विशिष्ट समयीं व विशिष्ट स्थळीं त्याच कलाकृती-बद्दलची प्रतिक्रिया व्यक्तिपरत्वें इतकी भिन्न व पुष्कळदां परस्परविरोधी आढळते कीं, वस्तुनिष्ठ असें कोणतेंहि अनुमान काढणें अशक्य व्हावें. तेव्हां सापेक्षतेला कांहीं निश्चितार्थ प्राप्त करून घ्यावयाचा असेल तर प्रथम एक ठाम स्थायी असा खुंट निश्चित करून ठेवला पाहिजे. आपण असा प्रश्न करतों : क्ष हा बिंदु कोठें आहे? त्याचें उत्तर देतांना








सापेक्षतेनें आपण ' क्ष ' कोठें आहे तें सांगतों. ' क्ष ' कोठें आहे तर ' ओ 'च्या दोन इंच उत्तरेस व दीड इंच पूर्वेस ! ' ओ ' हा खुंट ठाम स्थायी असल्या-मुळें ' क्ष ' त्याच्या सापेक्षतेनें कोठें आहे हें सांगतां येतें. पण ओ हा ठाम स्थायी खुंटच नसेल तर ? तर ' क्ष 'ची सापेक्षता निरर्थक ठरल्यावांचून राहणार नाहीं. 'ब'च्या सापेक्षतेनें क्ष अमुक अमुक ठिकाणीं आहे म्हणावें तर मुळांत ' ब ' जर अस्थायी असेल तर त्यामुळें अनिश्चितताच उत्पन्न होते. एखाद्या वस्तूचें कालावकाशांतील सापेक्ष स्थान काय, हें दर्शविण्याची जशी पद्धति आहे तशीच एखादी पद्धति नीतींतील औचित्याला व कलेंतील सुसंगती-ला लागू करूं शकलों तर दोहोंतील सापेक्षतेलाहि कांहीं निश्चितार्थ प्राप्त होऊं शकेल. पण औचित्य व सुसंगति यांच्या बाबतींत हें शक्य तरी आहे काय ? शक्य नसेल तर सापेक्षतारहित असा कांहीं तरी निश्चित अर्थ औचित्याला प्राप्त करून दिला पाहिजे. त्याचप्रमाणें सुसंगति ह्या प्रयोगालाहि तसलाच कांहीं तरी सापेक्षताविरहित अर्थ असला पाहिजे. आणि हें जर अशक्य असेल तर औचित्यावर अधिष्ठित असलेली नीति व सुसंगतीवर अधिष्ठित असलेली कला, दोन्ही निश्चितार्थाच्या अभावीं अनाकलनीयच ठरतात.

वागणुकींत औचित्य असलें म्हणजे ती वागणूक नीतिसंमत असें म्हटलें तर एखाद्या विशिष्ट कृती-बद्दल परस्परविरोधी भूमिका असणारे देखील म्हणतील कीं हें आम्हांला मान्य आहे ! मग त्यांच्या भूमिकांत विरोध कां ? विरोध असण्यास कारण त्यांच्या भिन्न भिन्न औचित्यविषयक धारणा. माझ्याकडे एक गृहस्थ भेटीस आले. मीं त्यांचें आनंदानें स्वागत केलें. त्यांना चहा, पानसुपारी दिली. त्यांच्याशीं सुखदुःखाच्या गोष्टी केल्या आणि मग ' या हं पुन्हां ! ' म्हणत त्यांना निरोप दिला. माझ्या धारणेप्रमाणें हें सगळें औचित्यास धरून झालें ! तेच गृहस्थ माझ्या दुसऱ्या एका मित्राकडे गेले. त्यांना तो मित्र ' या ' म्हणाला नाहीं, ' बसा ' म्हणाला नाहीं कीं त्यानें त्यांचें स्वागत केलें नाहीं. जेवढ्यास तेवढीं, त्यानें उत्तरें दिलीं आणि ते गृहस्थ निघून गेले तेव्हां, ' पुन्हां या ' म्हणून म्हटलें नाहीं. माझ्या मित्राला मी विचारलें, " तुझें हें वागणें औचित्यास धरून झालें काय ? " त्यानें उत्तर दिलें, " हो ! त्या गृहस्थाला मीं माझा मोलाचा वेळ देणें कदापिहि औचित्यास धरून झालें नसतें ! " बुद्धिवादाच्या ह्या युगांत आपण करूं तेंच औचित्याला धरून, हें सिद्ध करण्याची फारच उत्तम सोय झालेली आहे ! पूर्वी जेव्हां धर्मप्रणीतें सर्वसंमत असत तेव्हां औचित्याला निश्चितार्थ होता व त्यामुळें नीतीलाहि निश्चितार्थ होता. पण बुद्धिवादानें पहिला जर कोणता पराक्रम केला असेल तर तो धर्मप्रणीतांचे खुंट उपटून फेंकून देण्याचा. जुने खुंट उपटून टाकल्यावर दुसरे कोणते तेवढेच ठाम खुंट रोवण्यांत आले असते तर निदान त्यांच्या अनुषंगानें तरी औचित्य आहे कीं नाहीं तें ठरवितां आलें असतें. पण तसले कोणतेच ठाम खुंट नसल्यामुळें मी करीन तें माझ्या धारणे-प्रमाणें औचित्यास धरून व माझा मित्र करील तें त्याच्या धारणेप्रमाणें औचित्यास धरून ! फक्त समर्थनापुरता बुद्धिवाद हवा ! अशाप्रकारें नीतीला कोणताच निश्चितार्थ उरलेला नसल्यामुळें त्या क्षेत्रांत आज अराजकच दिसत आहे. आपण करूं तें औचित्यास धरून म्हणजे नीतिपूर्ण असल्याचा दावा प्रत्येकजण करूं शकतो आणि तोहि स्वतःच्याच परस्परविरोधी कृतींच्या बाबतींत !

नीतिसंबंधांत आणि औचित्यसंबंधांत जसा प्रकार आहे तसाच कलेसंबंधांत व तिच्यांतील सुसंगति आणि सौंदर्य या संबंधांतहि. सुदैवानें म्हणा कीं दुर्दैवानें म्हणा, नीतीच्या बाबतींत ज्याप्रमाणें कधीं एके काळीं धर्मप्रणीतांचे ठाम खुंट होते, त्याप्रमाणें ठाम खुंट कलेच्या क्षेत्रांत कधींच उपलब्ध नव्हते. नीतीच्या क्षेत्रांत, ठाम खुंटांच्या अभावीं, जी अन-वस्था आज माजलेली आढळते ती कलेच्या क्षेत्रांत एका अर्थानें सदा सर्वकाळीं राहिलेली आहे. धर्म-प्रणीतांचें जेव्हां अधिराज्य होतें तेव्हां कलेच्या क्षेत्रां-तहि एका विशिष्ट प्रमाणांत प्रामाण्य म्हणून कांहीं तरी असे. नाट्य कसें असावें तर भरतमुनि म्हणतात तसें ! पण प्रामाण्याला जुमानणारे जे होते त्यांची प्रतिभा अनिरुद्ध संचार करूं शकली नाहीं. व ज्यांच्या अनिरुद्ध प्रतिभाविलासांतून कला निर्माण








झाली त्यांच्या कलेला प्रामाण्यें लागूं करणें अवघड गेलें. ही गोष्ट वाटेल तितकीं उदाहरणें देऊन दाखवितां येईल. निरंकुशाः कवयः ! कवीला किंवा कलावंताला बंधनें नाहींत ! नियम नाहींत ! तो सर्वस्वीं विमुक्त ! कोणत्याहि प्रकारच्या प्रामाण्याचें कलानिर्मात्यावर दडपण असूं नये हेंच माझेंहि मत आहे. पण प्रामाण्य नसतांना कलेचा कस अजमावून पाहण्याचें साधन काय, हा प्रश्न उभा राहतो. एखाद्या विशिष्ट कलाकृतींत संवादित्व साधलें आहे ह्याची कसोटी काय ? सौंदर्याची सिद्धि झाली आहे हें कशावरून ? ह्या प्रश्नाचें उत्तर बहुधा आत्मनिष्ठ असतें. मी म्हणतों, अमुक एका कलाकृतींत मला संवादित्व प्रत्ययास आलें. माझा मित्र नेमकें त्याच्या उलट म्हणतो. मी माझ्या मित्राला वेड्यांत काढतों व माझा मित्र मला वेड्यांत काढतो. संवादित्व आहे हें सिद्ध करावयाला माझ्याजवळ कांहीं गमक नाहीं व माझ्या मित्राजवळहि कांहीं गमक नाहीं. तोच प्रकार सौंदर्याबद्दल. " मुळगांवकरांचीं चित्रें कशीं असतात ? " असा प्रश्न टाकला तर त्यांत संगति, संवादित्व, सौंदर्य सगळें कांहीं आहे असें आत्मप्रचीतीवरून सामान्य ग्राहक मला सांगतो. आणि पलीकडच्या घरांत राहणारा कलाप्रेमी मास्टर उल्हास मला सांगतो कीं, "त्यांत संवादित्व, संगति, सौंदर्य वगैरे कांहीं नाहीं. त्यांत मुळीं कलाच नाहीं ! " थोडक्यांत म्हणजे ठाम स्थायी खुंटांच्या अभावीं संवादित्व, सुसंगति, सौंदर्य यांची सापेक्षताहि कोणताहि निश्चितार्थ स्पष्ट करूं शकत नाहीं. याच कारणास्तव श्री. वऱ्हाडपांडे यांचें प्रतिपादन मला अपुरें वाटतें. जोंपर्यंत नीतींत सारभूत असलेलें औचित्य व कलेंत सारभूत असलेलें संवादित्व किंवा सुसंगति यांना आपण निश्चितार्थ प्राप्त करून देत नाहीं, तोंपर्यंत नीतीलाहि कांहीं निश्चितार्थ नाहीं, कलेलाहि कांहीं निश्चितार्थ नाहीं आणि दोहोंतील साधर्म्य–वैधर्म्यालाहि कांहीं निश्चितार्थ नाहीं. मग कला आणि नीति यांत विरोध आहे असें तुम्ही म्हटलें काय किंवा विरोध नाहीं असें म्हटलें काय ! दोहोंपासून मला, सामान्य माणूस म्हणून काय किंवा कलावंत म्हणून काय, कांहींच निश्चित असा बोध होऊं शकत नाहीं.

सामान्य माणूस म्हणून मला काय कळावयास हवें आहे ? तर एखादी विशिष्ट कृति औचित्यास धरून आहे किंवा नाहीं हें पडताळून बघण्याचें कांहीं तरी निश्चित गमक. कलावंत म्हणून मला काय कळावयास हवें आहे ? तर माझी कलाकृति सुसंवादी, सुसंगतिपूर्ण सौंदर्यपूर्ण झाली आहे किंवा नाहीं हें अजमावून पाहण्याची एखादी पडताळापद्धति. आमचा आजचा वैज्ञानिक ज्या वेळेला ह्या दोन गरजा पूर्ण करील त्या वेळीं सामान्य माणसाला वागणुकीचें शास्त्र कळेल आणि वर्तनांतील बेबंदशाही नष्ट करणें शक्य होईल. आणि त्याच वेळीं कलावंतालाहि अज्ञात आणि अमूर्त वाटणाऱ्या त्याच्या साध्याचें दर्शन घेणें शक्य होईल व त्यामुळें हवें तें जास्तींत जास्त प्रमाणांत आपल्या कलाकृतींत उतरविण्यासाठीं डोळसपणा त्याला लाभूं शकेल. तेव्हांच नीति आणि कला यांची व्याप्ति निश्चित होईल. तेव्हांच त्यांचीं व्यवच्छेदक लक्षणें हुडकून काढण्यांत व त्यांच्या अनुषंगानें दोन्ही परस्परपूरक असल्याचें प्रतिपादण्यांत तात्पर्य राहील. आज आपण दोहोंच्या बाबतींत अंधारांत आहोंत. औचित्याचा विचार आम्हांला नीतीप्रत नेऊं शकत नाहीं. आणि सुसंवादित्वाचा, सुसंगतीचा अगर सौंदर्याचा विचार आम्हांला कलेप्रत नेऊं शकत नाहीं. नीति म्हणून आम्ही कांहीं तरी उराशीं आवळून धरतों; तें फोल वाटलें म्हणजे फेकून देतों आणि दुसरें कवटाळतों. कला म्हणून आज एक विशिष्ट प्रकार आम्हांला अभिप्रेत असतो तर उद्यां तोच आम्हांला असंमत व्हायला लागतो. काल ज्याच्याकडे कुणी ढुंकून बघावयाला तयार नव्हतें त्या प्रकाराला आज कला म्हणून मान्यता मिळालेली आपल्याला आढळते. अशा या अंधारांत चांचपडण्याच्या अवस्थेंतून बाहेर यावयाचें असेल तर वैज्ञानिकाच्या पद्धतीनें कला आणि नीति यांचा आपण नव्यानें प्रारंभापासून अभ्यास करावयास हवा.

माणसानें केलेल्या एखाद्या विशिष्ट कृतीच्या किंवा कलावंतानें निर्माण केलेल्या विशिष्ट कलाकृतीच्या मागें त्या त्या व्यक्तीचें सर्वात्मप्रधान (whole) व्यक्तिमत्त्व असतें, हें विधान विज्ञानमान्य झालेलें आहे. तेव्हां कला आणि नीति यांचीं व्यवच्छेदक लक्षणें माणसाच्या या सर्वात्मप्रधान व्यक्ति-








मत्त्वांत म्हणजे आंतरिक सृष्टींत शोधलीं पाहिजेत. मला वाटतें कीं, ह्या दिशेनें वळल्याशिवाय तरणोपायच नाहीं. औचित्याची सापेक्षता निश्चितार्थानें अजमावण्याची क्रिया आंतरिक सृष्टींतच शक्य आहे; त्याचप्रमाणें कलानिर्मितींतील सुसंवादित्व व सुसंगति अजमावणेंहि आंतरिक सृष्टींतच शक्य आहे.

ॲलेक्सिस् कॅरेलसारखे आधुनिक वैज्ञानिक म्हणतात कीं बाह्य आणि बाह्यार्थबद्ध सृष्टीचा अभ्यास पूर्णावस्थेस पोहोंचूनहि माणसाचे प्रश्न सुटूं शकले नाहींत. स्वतः कॅरेल म्हणतो कीं, चातुर्मापनप्रमाणात्मक ( four-dimensional ), बाह्य आणि बाह्यार्थबद्ध ( outer and objective ) सृष्टीपेक्षां माणसाची आंतरिक सृष्टि जास्त महत्त्वाची आहे; नव्हे जास्त सत्यार्थपूर्णहि ( real ) आहे. जी सुनियमितता आपण बाह्य आणि बाह्यार्थबद्ध सृष्टींत कल्पितों ती वस्तुतः तिच्या ठायींची नाहीं. तिची बैठक आंतरिक सृष्टींत आहे. आपल्या ' Man the Unknown ' ह्या जगद्विख्यात ग्रंथांत कॅरेलनें ह्या आंतरिक सृष्टीसंबंधीं अनेक प्रश्न स्वतः उपस्थित केले आहेत व स्वतः शक्य तोंपर्यंत त्यांचीं उत्तरें हुडकण्याचा प्रयत्न केलेला आहे. कॅरेलचा हा प्रयत्न पूर्णतया सफल झालेला आहे असें नव्हे. त्याचा तसा दावाहि नाहीं. पण जी दिशा कॅरेलनें दाखविलेली आहे त्या दिशेला तोंड वळवतांच पुष्कळ कूट प्रश्न सुटण्याची आशा वाटावयाला लागते. कला आणि नीति यांच्यांतील संवादित्व व औचित्य यांचें गूढ त्यांतलेंच आहे.

बाह्य आणि बाह्यार्थबद्ध सृष्टींत कल्पिण्यांत आलेली सुनियमितता ही तिच्या ठायींची नव्हे तर ती वस्तुतः आंतरिक सृष्टीच्या ठायींची होय. त्याचप्रमाणें विशिष्ट कृतीच्या ठायींचें औचित्य हें वस्तुतः त्या कृतीच्या ठायींचें नव्हे तर आंतरिक सृष्टीच्या ठायींचें होय, हें आपण मान्य केलें पाहिजे. आणि त्याचप्रमाणें कलाकृतीच्या ठायींचें संवादित्व व सुसंगति कलाकृतीच्या ठायींचीं नव्हत तर तीं वस्तुतः आंतरिक सृष्टीच्या ठायींचीं आहेत, हेंहि आपण स्वीकारलें पाहिजे. थोडक्यांत म्हणजे बाह्यसृष्टींत जशी सुनियमितता तसें वर्तणुकींत औचित्य आणि कलाकृतींत सुसंवादित्व व सुसंगति; आणि या तिन्ही गोष्टी आंतरिक सृष्टीचे विशिष्ट प्रकृतिधर्म होत.

बाह्य आणि बाह्यार्थबद्ध सृष्टीचे सर्व निसर्गनियम वैज्ञानिकानें जसे संशोधून काढले आहेत तसे ते त्यानें आंतरिक सृष्टीचेहि संशोधून काढले कीं कार्यभाग फारच सोपा होणार आहे. आंतरिक सृष्टीचें विज्ञान पूर्णपरिणत झालें कीं घटकावयवांतर्गत संवादित्व म्हणजे काय, सुसंगति म्हणजे काय, सुनियमितता म्हणजे काय इत्यादींना आपल्या दृष्टीनें स्पष्ट असा अर्थ प्राप्त होईल. आंतरिक सृष्टीचे व्यापार कसे चालतात हें आकलन झालें म्हणजे आज असलेली प्रतिभा, स्फूर्ति, प्रेरणा, साक्षात्कार इत्यादींसंबंधींचीं अनेक गूढें आपल्याला उकलतील. प्रतिभेचा विलास कसा चालतो व कलानिर्मिति कशी होते, ह्याचें गूढ स्पष्ट होईल आणि अनुषंगानें संवादित्व, सुसंगति यांनाहि कांहीं निश्चितार्थ प्राप्त होईल. हाच प्रकार माणसाच्या अन्य कृतींच्याहि बाबतींत लागूं होईल. जसें कलाकृतीच्या मागें आंतरिक सृष्टीचे कार्यान्वित झालेले निसर्गनियम असतात तसेंच माणसाच्या अन्य कृतींच्या बाबतींतहि कृतींत आविष्कृत झालेलें आंतरिक सृष्टीचें जें सुसंवादित्व असतें त्याला आपण औचित्य हें नांव देऊं. या औचित्यकल्पनेवर एक नवें भरभक्कम नीतिशास्त्र प्रस्थापित होईल. हें नीतिशास्त्र आणि आंतरिक सृष्टीच्याच अंतर्गत संवादित्वावर व सुसंगतीवर अधिष्ठित झालेलें नवें कलाशास्त्र हीं विरोधी असूंच शकणार नाहींत; तीं परस्परपूरकच असलीं पाहिजेत. कारण दोहोंची बैठक माणसाचें सर्वात्मप्रधान अस्तित्व, त्याची आंतरिक सृष्टि ही राहील. तीं दोन शास्त्रें म्हणजे माणसाच्या सर्वात्मपरिशीलनाचीं दोन अंगें राहातील व कला आणि नीति माणसाच्या सर्वात्म्याच्या दोन बाजू राहतील. आपलें ज्ञान या अवस्थेप्रत येईपर्यंत नीतीचें स्वरूप असेंच कामचलाऊ व जुजबी रहावयाचें आणि कलेसंबंधांतहि अनेक बौद्धिक भ्रम प्रचलित रहावयाचे. त्याचप्रमाणें दोहोंत विरोधहि निर्माण व्हावयाचाच आणि औचित्य, सुसंवादित्व, सुसंगति हे शब्दप्रयोग कितीहि मोहक वाटले तरी तोंपर्यंत निश्चितार्थाच्या दृष्टीनें त्यांचा फारसा उपयोग व्हायचा नाहीं.








प्रा. स. वा. कोगेकर

# लखनौची पॅसिफिक-संबंध-परिषद्

## परिषदेमागील संस्था

गेल्या १९५० ऑक्टोबरच्या ३ तारखेपासून १४ तारखेपर्यंत 'इन्स्टिटयूट ऑफ पॅसिफिक रिलेशन्स' या आंतरराष्ट्रीय संस्थेची ११ वी परिषद् प्रथमच हिंदुस्थानांत लखनौ येथें भरली होती. १९२५ सालीं हवाई बेटांत स्थापन झालेल्या या संस्थेचा उद्देश पॅसिफिक क्षेत्रांत मोडणाऱ्या राष्ट्रांपुढील प्रश्नांचा अभ्यास करून त्यांच्यांतील परस्परसंबंध सुधारण्यास मदत करणें हा आहे. संस्थेतर्फे या कामास वाहिलेलें एक त्रैमासिक चालविण्यांत येत असून निरनिराळ्या प्रश्नांवर संशोधन-ग्रंथ, माहिती-पुस्तिका वगैरे साहित्यहि निर्माण केलें जातें. आतांपर्यंत अशा प्रकारचे बरेच ग्रंथ प्रसिद्ध झाले असून त्यांपैकीं कित्येकांस प्रमाण-ग्रंथ मानण्यांत आलें आहे. निरनिराळ्या अकरा देशांतील आंतरराष्ट्रीय प्रश्नांचा अभ्यास करणाऱ्या संस्था या संस्थेच्या सभासद असून तिचा कारभार चालविण्यांत हातभार लावीत आहेत. प्रत्येक राष्ट्रीय संस्था स्वतःचें असें वेगळें प्रकाशन व संशोधनकार्यहि करीत असतें. इंग्लंडमधील 'रॉयल इन्स्टिटयूट ऑफ इंटरनॅशनल अफेअर्स' व दिल्लीची 'इंडियन कौन्सिल ऑफ वर्ल्ड अफेअर्स' या संस्था प्रत्येकीं इंग्लंड व हिंदुस्थान या देशांत अशा प्रकारें कार्य करीत असतात. ऑस्ट्रेलिया, कॅनडा, फ्रान्स, जपान, न्यू झीलंड, पाकिस्तान, फिलिपीन्स, अमेरिका या देशांतहि अशाच संलग्न संस्था कार्य करीत आहेत. रशियामध्येंहि एक संस्था आहे व औपचारिक रीत्या अद्यापहि ती संलग्न संस्था म्हणून मानण्यांत येते. दर दोन-तीन वर्षांनीं या सर्व देशांतील प्रतिनिधींची एक परिषद् घेण्यांत येते व तींत निरनिराळ्या प्रश्नांची मोकळेपणानें चर्चा करण्यांत येऊन विचारांस चालना देण्याची आणि परस्परांत अधिक समजूतदारपणाचें वातावरण निर्माण करण्याची संधि प्राप्त होते. लखनौस भरलेली परिषद् अशाच प्रकारची होती. परिषदेस पाठविण्यांत आलेले प्रतिनिधी त्या त्या देशांतील संलग्न संस्थेनें नियोजित केलेले होते. शिवाय ज्या देशांत संलग्न संस्था अस्तित्वांत नाहींत, परंतु जे देश पॅसिफिक क्षेत्रांत मोडतात अशांचे कांहीं 'पाहुणे'—प्रतिनिधीहि परिषदेस बोलाविण्यांत आले होते. या क्षेत्रांत काम करणाऱ्या संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या संस्थांपैकीं कांहींनीं आपलेहि निरीक्षक या परिषदेस पाठविले होते.

## परिषदेचा उद्देश व व्याप्ति

वरील परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें 'इन्स्टिटयूट ऑफ पॅसिफिक रिलेशन्स'च्या परिषदेंत केवळ विचारविनिमयास प्राधान्य दिलेलें असतें. त्यांतून विशिष्ट प्रश्नावर एकमत घडवून आणणें, ठराव पास करणें, अगर कोठलाहि निर्णय घेणें हा उद्देश नसतो. कोठल्याहि प्रश्नावर संस्थेचें असें मत नसतें. परिषदेस जमलेले प्रतिनिधीहि कोठला विशिष्ट दृष्टिकोन पत्करण्यास अगर मांडण्यास बांधलेले नसतात. जो तो आपलें मत बनविण्यास व तें प्रदर्शित करण्यास पूर्णपणें स्वतंत्र असतो. असें जरी असलें तरी या परिषदांस येणारे प्रतिनिधी निरनिराळ्या क्षेत्रांतील प्रमुख अभ्यासक, अधिकारी किंवा कार्यकर्ते असल्यानें त्यांच्यांतील चर्चेस साहजिकच महत्त्व प्राप्त होतें. जरी संस्थेजवळ प्रत्यक्ष राजकारणावर दडपण आणण्याची कोणतीच शक्ति नसली तरी परिषदेंतील

अनुक्रमणिका






चर्चेचा अप्रत्यक्षपणें राजकारणी पुरुषांच्या मनावर परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. परिषदेंत पुढें मांडलेल्या माहितीचा, मुद्द्यांचा व मतांचा परिणाम या क्षेत्राशीं संबंध असणाऱ्या अभ्यासकांवर, वृत्त-पत्रांवर, लेखकांवर व कार्यकर्त्यांवर होत असल्यामुळें अप्रत्यक्षपणें परिषदेचें कार्यक्षेत्र बरेंच विस्तृत होतें. अलीकडे तर पॅसिफिक क्षेत्रांतील घडामोडींना जागतिक महत्त्व प्राप्त झालें असल्यामुळें त्यांची चर्चा करणाऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदेकडे कुतूहलानें पाहिलें जाणें अपरिहार्यच आहे.

लखनौ-परिषदेस आणखीहि दोन दृष्टींनीं महत्त्व प्राप्त झालें होतें. एक तर हिंदुस्थानांत भरणारी ही पहिलीच पॅसिफिक रिलेशन्स परिषद् होती. आधींच ही दरसाल भरणारी परिषद् नाहीं. त्यांतून अनेक देशांतील संस्था तिच्याशीं संलग्न झाल्यामुळें परिषद् भरविण्यास आमंत्रणेंहि बरींच असणार. तेव्हां यानंतर दहा-वीस वर्षांत देखील ही परिषद् पुनः हिंदुस्थानांत भरविली जाणार नाहीं. त्यांतच हिंदु-स्थानचे पंतप्रधान व परराष्ट्रमंत्रि श्री. नेहरू स्वतः या परिषदेचें उद्घाटन करण्यास येणार होते. हिंदुस्थान स्वतंत्ररीत्या जगांतील राजकारणांत भाग घेऊं लागला आहे याची ती साक्षच होती. श्री. नेहरूंच्या बरोबर अर्थात् प्रसिद्धि आलीच. आणि याच देशांत नव्हे तर परदेशांतहि परिषदेंतील चर्चा ठळकपणें वृत्तपत्रांत येऊं लागली. साहजिकच परिषदेविषयीं बरेंच कुतूहल व अपेक्षा निर्माण झाल्या होत्या.

दुसरी गोष्ट म्हणजे परिषदेपुढें चर्चेसाठीं ठेवलेला विषय—किंवा विषय-समुच्चय म्हटलें असतां अधिक यथार्थ होईल—' पूर्वेकडील राष्ट्रवाद व त्यामुळें निर्माण झालेले प्रश्न ' असा असल्यामुळें एका परीनें आमच्या जागतिक राजकारणाच्या गाभ्यालाच हात घातला जाणार होता. अमेरिक व रशिया यांच्यांतील संघर्ष आज पॅसिफिक क्षेत्रांतच वाढतें उग्र स्वरूप धारण करूं लागला असून इकडील राष्ट्रांत वाहणाऱ्या विविध प्रवाहांचा ते आपापल्या दृष्टीनें उपयोग करून घेत आहेत असा सर्वसामान्य समज पसरलेला असल्यामुळें या विषयावरील चर्चेलाहि बरेंच प्रासं-गिक महत्त्व व कांहींसें कठोर स्वरूप येणें स्वाभाविक होतें. दुर्दैवानें चीन व रशिया या दोन्ही देशांचे प्रतिनिधी परिषदेस हजर नव्हते. त्यामुळें एक महत्त्वाचा दृष्टिकोन योग्य रीतीनें पुढें मांडला गेला नाहीं, ही परिषदेंतील वादविवादांत एक मोठीच उणीव होती. चीनमधील अंतःस्थ बदलांमुळें तेथील संलग्न संस्थेच्या अस्तित्वाबद्दलच वांधा होता. परंतु रशियाचे प्रतिनिधी येण्यास हरकत नव्हती. १९३६ नंतरच्या कोणत्याहि परिषदेस रशियाचे प्रतिनिधी हजर राहिले नाहींत असें समजतें.

**प्रतिनिधि-मंडळें.**

लखनौ परिषदेस एकूण १६ देशांचे प्रतिनिधी उपस्थित होते. त्यांपैकीं ९ देशांच्या संलग्न संस्थांनीं प्रतिनिधि-मंडळें पाठविलीं होतीं; इतर ७ देशांतील प्रतिनिधी ' पाहुणे ' म्हणून पाचारलेले होते. त्याशिवाय संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या वेगवेगळ्या सहा संस्थांनीं आपले निरीक्षक पाठविले होते. प्रत्येक देशाच्या प्रतिनिधींची संख्या वेगवेगळी होती. पर-देशांत जाण्यास सवड व त्यासाठीं लागणारा पैसा या दोन गोष्टींचा विचार करून निरनिराळ्या राष्ट्रीय संस्थांनीं आपलीं प्रतिनिधिमंडळें नियुक्त केलीं होतीं. हिंदुस्थानचें प्रतिनिधिमंडळ साहजिकच सर्वांत मोठें म्हणजे २३ जणांचें होतें. पण, ही सर्व मंडळी परिषदेच्या सुरुवातीपासून शेवटपर्यंत उपस्थित नस-ल्यामुळें, कोणत्याहि एका वेळीं १६–१७ पेक्षां अधिक हिंदी प्रतिनिधी दिसले नाहींत. प्रतिनिधींच्या संख्येप्रमाणेंच त्यांची निरनिराळ्या व्यवसायांत वर्ग-वारी केल्यास बराच फरक नजरेस येतो. शक्य तर समाजांतील सर्व प्रमुख क्षेत्रांतील मंडळींचा समावेश करण्याचा प्रयत्न करण्यांत आला असला तरी परिषदेंत भाग घेऊं शकतील व सुमारें दोन आठवडे








सतत एके ठिकाणीं राहण्याची ज्यांना सवड आहे, अशांचीच निवड करणें प्राप्त असल्यानें तो सर्वत्र यशस्वी झाला असें म्हणतां येत नाहीं. खालील [1] कोष्टकावरून प्रतिनिधिमंडळांच्या बनावाची कल्पना येईल. संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या संस्थांतर्फे आलेले ९ निरीक्षक विचारांत घेतां एकंदर १०४ प्रतिनिधी हजर होते. प्रतिनिधींच्या वर्गवारीसंबंधीं इतकी तपशीलवार माहिती देण्याचें कारण असें कीं, त्यावरून चर्चेच्या स्वरूपाची कल्पना यावी. प्राध्यापकांची मोठी संख्या सूचक आहे. केवळ भीड किंवा राजनैतिक डाव म्हणून वरवर, हातचें राखून बोलणीं करण्यापेक्षां निर्भीड, वस्तुस्थिति स्पष्टपणें उघड करून दाखविणारी, कांहींशी आव्हानकारक चर्चा व्हावी हा परिषदेचा हेतु साध्य होण्यास तीमुळें मदत होण्यासारखी होती. परिषदेंतील हिंदी प्रतिनिधींच्या तिखट वक्तव्यांबद्दल कांहीं वृत्तपत्रांतून जी टीका करण्यांत आली ती परिषदेच्या स्वरूपाविषयींच्या अज्ञानांतूनच जन्माला आली होती, असें म्हणावें लागतें. उलट, ज्यांनीं यापूर्वींच्या परिषदा पाहिल्या होत्या अशा माहितगारांच्या मतें लखनौची परिषद त्या मानानें 'मऊ' झाली असें सांगण्यांत आलें. वर उल्लेखिलेल्या कोष्टकावरून आणखीहि एका गोष्टीसंबंधींचा गैरसमज दूर होईल असें वाटतें. ती म्हणजे परिषदेस उपस्थित राहिलेल्या प्रतिनिधींच्या 'प्रातिनिधिक' स्वरूपाबद्दल. प्रतिनिधींची निवड त्यांच्या वैयक्तिक गुणांवरून व त्या त्या देशाच्या:संलग्न संस्थेनें केलेली असल्या-

---

[1] प्रतिनिधींचें व्यवसायदृष्ट्या वर्गीकरण

| | विद्यापीठांत अध्यापन | राजकारण, समाजसेवा | राजनैतिक, सरकारी नोकरी | वृत्तपत्र-व्यवसाय | उद्योगधंदा वा अन्य अर्थव्यवहार | आंतरराष्ट्रीय प्रश्नांचे अभ्यासक | एकूण प्रतिनिधि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. कॅनडा | २ | — | ३ | ४ | १ | १ | ११ |
| २. फ्रान्स | ३ | — | — | — | — | — | ३ |
| ३. हिंदुस्थान | ७ | ५ | २ | ३ | ५ | १ | २३ |
| ४. जपान | — | १ | — | १ | ३ | — | ५ |
| ५. न्यू झीलंड | १ | — | — | १ | — | — | २ |
| ६. पाकिस्तान | २ | — | — | — | २ | २ | ६ |
| ७. फिलिपीन्स | २ | — | — | — | १ | — | ३ |
| ८. ब्रिटन | २ | २ | १ | ४ | ३ | २ | १४ |
| ९. अमेरिका | ५ | ३ | १ | २ | ३ | २ | १६ |
| १०. ऑस्ट्रेलिया | — | — | २ | — | — | — | २ |
| ११. ब्रह्मदेश | — | — | १ | — | १ | — | २ |
| १२. सीलोन | — | १ | — | — | — | — | १ |
| १३. इंडोनेशिया | १ | १ | १ | — | — | — | ३ |
| १४. मलाया | १ | — | — | — | — | — | १ |
| १५. हॉलंड | १ | — | — | — | — | — | १ |
| १६. इंडोचीन | — | — | २ | — | — | — | २ |
| एकूण | २७ | १३ | १३ | १५ | १९ | ८ | ९५ |





अनुक्रमणिका

मुळें, आलेले प्रतिनिधी हे त्या त्या देशाचें ' प्रतिनिधित्व ' मर्यादित अर्थानेंच करूं शकत होते. साधारणतः आंतरराष्ट्रीय परिषदांत एखाद्या देशाचे प्रतिनिधी म्हणजे त्या देशांतील सरकारचे प्रतिनिधी, व एकमुखानें त्या देशांतील सरकारी धोरणाचा पाठपुरावा करणारे सभासद अशी समजूत असते. परंतु 'इन्स्टिटयूट ऑफ पॅसिफिक रिलेशन्स' ही संस्था बिन-सरकारी असल्यामुळें व तिचें स्वतःचें असें कोठलेंहि विशिष्ट धोरण नसल्यामुळें, व तीच परिस्थिति संलग्न संस्थांची असल्यामुळें, या परिषदेस जमलेले प्रतिनिधी वरील अर्थानें ' प्रातिनिधिक ' म्हणतां येत नाहींत. अर्थात् कित्येक प्रश्नांवर एखाद्या देशांतील प्रतिनिधींचा दृष्टिकोन तेथील सरकारच्या दृष्टिकोनाशीं तंतोतंत जुळणेंहि संभवनीय आहे. परंतु अशा परिस्थितींत देखील प्रतिनिधींनीं केलेलीं विधानें व दिलेलीं स्पष्टीकरणें हीं त्या सरकारच्या धोरणाचें आधिकृत विशदीकरण होत, असें मानणें बरोबर होणार नाहीं. ही गोष्ट परिषदेंत प्रत्यक्ष भाग घेणाऱ्या सभासदांस जितकी सहजपणें कळून येते तितकी बाहेरून निरीक्षण करणाराच्या लक्षांत येत नाहीं व त्यामुळें परिषदेंतील चर्चेस चुकून निराळ्याच पातळीवर लेखण्यांत येतें. पण यावरून असेंहि अनुमान निघूं नये कीं, चर्चेंत भाग घेणारी मंडळी कोणाचीच प्रतिनिधी नाहींत, किंवा त्यांचीं मतें अगदींच तऱ्हेवाईक असतात.

## परिषदेची कार्यपद्धति

परिषदेची कार्यपद्धति पाश्चात्य राष्ट्रांत रूढ असली तरी आपल्याकडे जरा नवीनच आहे. शंभरांहून अधिक प्रतिनिधींनीं एकत्र चर्चा करावयाची म्हणजे तिला भाषणबाजीचें स्वरूप येतें; विचार-विनिमय असा फारसा होऊं शकत नाहीं. हा दोष टाळण्यासाठीं प्रतिनिधींचे तीन गट पाडण्यांत आले होते. प्रत्येक गटांत ३० ते ४० प्रतिनिधींची योजना केलेली होती. प्रत्येक गटांत शक्य तर प्रत्येक राष्ट्रानें सहभागी व्हावें, अशी अपेक्षा होती. पण ज्या देशांतून तीनपेक्षांहि कमी प्रतिनिधी आले होते त्यांना अर्थातच सर्व गटांत सहभागी होणें शक्य झालें नाहीं. कोठल्या गटांत कोठल्या प्रतिनिधीनें बसावयाचें तें प्रत्येक राष्ट्राचे प्रतिनिधी आपापसांत ठरवीत असत. सामान्यपणें प्रत्येक प्रतिनिधीच्या कलाप्रमाणें हा निर्णय घेतला जाई. पण कित्येक वेळीं, चर्चेच्या गरजेप्रमाणें, वैयक्तिक आवडी-निवडी बाजूस ठेवूनहि विशिष्ट गटांत बसावें लागे. हेतु हा कीं, प्रत्येक महत्त्वाचा दृष्टिकोन व तज्ज्ञांची विचार-संपदा यांचा फायदा परिषदेस मिळावा. अशा प्रत्येक गटासाठीं किंवा परिषदेच्या परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे 'गोल-मेजां' (Round Table) साठीं एक अध्यक्ष व एक 'प्रवक्ता' यांची निवड करण्यांत येई. हे दोन्ही पदाधिकारी एकाच देशाच्या प्रतिनिधि-मंडळांतून न निवडतां मुद्दामच वेगवेगळ्या प्रतिनिधि-मंडळांतून निवडलेले असत. अध्यक्षाच्या कामकाजा-विषयीं मुद्दाम सांगावयाची गरज नाहीं. पण 'प्रवक्ता' म्हणून नेमलेल्या प्रतिनिधीचें विशिष्ट कार्य असे. (अन्य सुटसुटीत व यथार्थ शब्दाच्या अभावीं 'रापोर्तर' या फ्रेंच भाषेंतून घेतलेल्या शब्दाचें 'प्रवक्ता' असें भाषांतर येथें केलें आहे.) आपल्या 'गोलमेजां'त झालेल्या चर्चेचा सारांश काढून तो संकलित स्वरूपांत सबंध परिषदेस सादर करणें हें या 'प्रवक्त्या'चें काम असे. प्रवक्ता व अध्यक्ष हे दोघेहि चर्चेंत इतर कोणत्याहि प्रतिनिधीप्रमाणें भाग घेऊं शकत व घेतहि. पण त्यामुळें प्रवक्त्याचें कार्य थोडें अवघड होत असे. कारण चर्चेचा सारांश काढतांना सर्व दृष्टिकोन निःपक्षपातीपणें पुढें मांडण्या-ऐवजीं स्वतःच्या मतांस वाजवीपेक्षां अधिक महत्त्व दिलें जाण्याच्या शक्यतेपासून त्यांस सारखें सावध राहावें लागे. इतकें करूनहि अभावितपणें तशा प्रकारची चूक करण्याची पाळीहि त्यांवर येई. प्रवक्त्यास आपलें कार्य व्यवस्थितपणें पार पाडतां यावें म्हणून चर्चेचा जवळजवळ अक्षरशः वृत्तान्त टिपून घेणाऱ्या लघुलेखकांचें साहाय्य त्यास दिलें जाई. एका बैठकींत दोन ते अडीच तासपर्यंत चर्चा होई व दिवसांतून अशा दोन बैठका भरत. चर्चेंत अनौपचारिकता राखण्यांत येई. प्रत्येकानें बसूनच व संभाषणांत भाग घेतल्याप्रमाणें थोडें थोडें बोलावें, परस्परांना आपले मुद्दे मोकळेपणानें मांडूं द्यावेत, चर्चेच्या प्रगतीसाठीं एकच व्यक्ति अनेक वेळां बोलली तरी हरकत नसावी; अध्यक्षानें चर्चेची गाडी










मुद्द्याच्या मार्गावरून ढळूं देऊं नये, अशा गोष्टींवर कटाक्ष असे.

चर्चेच्या विषयाचे दोन भाग करण्यांत आले होते. राष्ट्रवादामुळें निर्माण झालेल्या 'अंतर्गत' प्रश्नांचा ऊहापोह पहिल्या भागांत करावयाचा होता; 'आंतरराष्ट्रीय' प्रश्नांचा ऊहापोह दुसऱ्यांत करावयाचा होता. पहिल्या भागाच्या चर्चेसाठीं परिषदेची तीन 'प्रादेशिक' 'गोल-मेजां'त विभागणी केलेली होती. दक्षिण आशिया, आग्नेय आशिया व अतिपूर्व असे आशियाई देशांचे गट पाडून प्रत्येक गटांतील अंतर्गत प्रश्नांची चर्चा त्या त्या प्रादेशिक 'गोल-मेजां'त होई. तीन दिवसांच्या चर्चेनंतर त्या त्या 'गोलमेजा'च्या प्रवक्त्यानें संबंध परिषदेपुढें आपल्या गटांतील चर्चेचा वृत्तान्त निवेदन केला. या निवेदनावर सर्वांना खुली अशी चर्चा झाली; पण तिचें स्वरूप गोलमेजांतील चर्चेपेक्षां वेगळें होतें. प्रत्येक वक्त्यानें व्यासपीठावर जाऊन आपलें म्हणणें मांडावयाचें असा शिरस्ता होता. त्यामुळें या चर्चेला 'मतदर्शन' असेंच म्हणणें युक्त होईल. हीच पद्धति दुसऱ्या विभागाच्या चर्चेसहि लावण्यांत आली. मात्र विषयाची विभागणी प्रादेशिक तत्त्वावर न करतां ती पोट-विषयवार करण्यांत आली होती. राजकीय व लष्करी डावपेंचाचे प्रश्न, आर्थिक व चलनविषयक प्रश्न आणि आर्थिक व सामाजिक प्रश्न अशा तीन पोट-विषयांत राष्ट्रवादाच्या आंतरराष्ट्रीय प्रश्नांचा विचार करावयाचा होता. आर्थिक प्रश्न बरेच गुंतागुंतीचे व त्यांचीं अंगें-उपांगेंहि बरींच असल्यामुळें त्यांचा ऊहापोहच दोन गोलमेजांत करण्याचें ठरविलें होतें. ही चर्चा चार दिवस चालली होती.

चर्चेच्या विषयाला अनुलक्षून प्रत्येक देशाच्या संलग्न संस्थेनें निरनिराळ्या प्रश्नांवर वस्तुनिष्ठ निबंध तयार करवून घेऊन पाठविले होते. त्यांच्या प्रती प्रतिनिधींस वांटण्यांत आल्या होत्या. हे निबंध अत्यंत परिश्रमपूर्वक तयार केले असले तरी त्यांपैकीं बरेचसे इतक्या उशीरा हातीं आले कीं, ते काळजीपूर्वक वाचण्यास लागणारी फुरसद मिळूं शकली नाहीं. त्यांतील कित्येक गोष्टी विशद करण्यासाठीं 'गोल-मेजा'च्या बैठकीचा वेळ द्यावा लागला. पण त्यामुळें या बैठकींत नुसतें बसल्या-बसल्याहि कित्येक घटनांची माहिती उद्बोधकरीत्या मिळूं शकली हा एक फायदाच झाला.

दोन्ही विभागांच्या मिळून सहा 'गोल-मेजां'तील चर्चेच्या, त्या त्या प्रवक्त्यांनीं सादर केलेल्या, सारांशाच्या प्रती सर्व प्रतिनिधींस वांटण्यांत आल्या असून त्यांवरून परिषदेंत झालेल्या विचारविनिमयाची स्थूलमानानें कल्पना येऊं शकते.

### अमेरिका व हिंदुस्थान

श्री. नेहरूंनीं परिषदेचें उद्घाटन करतांना केलेल्या भाषणापासून तों पं. कुंझरूंनीं परिषद् बरखास्त झाल्याचें जाहीर करतांना केलेल्या भाषणापर्यंत संबंध परिषदेंत अमेरिका आणि हिंदुस्थान यांच्या प्रतिनिधींच्या दृष्टिकोनांतील फरक वेळोवेळीं विशेष प्रामुख्यानें प्रकट होत होता, ही परिषदेसंबंधींची सर्वांच्याच मनावर परिणाम करणारी गोष्ट ठरली. पाश्चात्य राष्ट्रांचें धुरीणत्व प्रथमच अंगावर पडलेल्या अमेरिकेची जागतिक राजकारणाकडे पाहण्याची दृष्टि आणि आशियांतील राष्ट्रांत प्रथमच स्वतंत्रपणें वावरणाऱ्या हिंदुस्थानचा दृष्टिकोन या दोहोंवर कांहींशी नवशिकेपणाची छाया पडली असल्यास नवल नाहीं. पण चीन-रशिया यांच्या अनुपस्थितींत आणि ब्रिटनच्या मुरब्बी अबोलपणामुळें पाश्चात्य राष्ट्रांचें धोरण मुख्यतः अमेरिकेच्या प्रतिनिधींकडूनच पुढें मांडलें जाई व आशियांतील नवोदित राष्ट्रांचा दृष्टिकोन प्रामुख्यानें हिंदी प्रतिनिधीच विशद करीत. हिंदुस्थानवर ही जबाबदारी पडण्याचें एक कारण इतर आशियाई देशांचें अपुरें प्रतिनिधित्व. पण दुसरेंहि एक कारण होतें. तें म्हणजे फिलिपीन्स सोडून राहिलेल्या आशियांतील इतर देशांचें प्रतिनिधित्व करणारी मंडळी त्या त्या देशांतील सत्ताधारी गटाच्या धोरणाचा पाठपुरावा करणारी होती. त्यामुळें पूर्वग्रहविरहित दृष्टीनें तेथील घडामोडींचा ऊहापोह करणें त्यांस शक्य नव्हतें. ही गोष्ट इंडोचीनच्या बाबतींत विशेष रीतीनें स्पष्ट झाली; कारण दोन्ही प्रतिनिधी फ्रेंचांनीं पुरस्कार केलेल्या बाओ दायी सरकारचे अनुयायी होते. परदेशांत जाण्यास 'लायक' असेच प्रतिनिधी प्रवासाच्या सवलती मिळवूं शकले असल्यामुळें ही घटना अपेक्षित होती; परंतु त्यामुळें

अशा देशांतील इतर महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख व मूल्यमापन करण्याची कामगिरी इतर प्रतिनिधीं-वर सहजच आली. आशियाई देशांपैकीं हिंदी प्रतिनिधी सर्वांत निर्भीड व मोकळ्या मनाचे. कधीं कधीं पाकिस्तानी प्रतिनिधीहि त्यांचा पाठपुरावा करीत. या परिस्थितींत प्रत्येक वादग्रस्त मुद्द्याच्या चर्चेला अमेरिका विरुद्ध हिंदुस्थान, असें स्वरूप प्राप्त होणें अपरिहार्यच म्हटलें पाहिजे.

प्रथमपासून शेवटपर्यंत नजरेंत भरणारी दुसरी गोष्ट म्हणजे अमेरिकेच्या प्रतिनिधींचा कम्युनिझम–रशिया–विरोध. कम्युनिस्ट पद्धति ही लोकशाहीस मारक आहे, आक्रमक आहे आणि तिचा पाठीराखा म्हणून रशिया हाहि तितकाच विध्वंसक आहे व त्यास शह देणें जागतिक शांततेस आवश्यक आहे; त्यासाठीं अमेरिकेची आर्थिक, लष्करी व राजनैतिक मदत पूर्वेकडील देशांत देणें म्हणजे त्यांचें स्वातंत्र्य टिकवून धरण्यास मदत करणें होय; आणि या-शिवाय अन्य दृष्टिकोन असणें म्हणजे रशियन आक्रमकांस आमंत्रण देण्यासारखें आहे; ही विचार-सरणी एक गृहीत गोष्ट समजूनच अमेरिकन प्रति-निधी बोलत असत. उलट, प्रत्येक देशाची व्यवस्था कशी असावी हें त्या त्या देशानें ठरवावें; चीन-सारख्या एखाद्या देशास कम्युनिस्टपद्धति पसंत असल्यास ती उलथून पाडण्यासाठीं इतर देशांनीं प्रयत्न करण्याचें कारण नाहीं, अमेरिकेसारख्या देशानें अशा रीतीनें प्रयत्न करण्यामुळें अशा देशां-तील प्रतिगामी शक्तींचीच जोपासना होते व परि-णामतः अमेरिकेवरील त्यांचें परावलंबन म्हणजे एक प्रकारची वासाहतिक स्थितीच होय, अशा तऱ्हेचे विचार हिंदी प्रतिनिधींकडून मांडले जात. अर्थात् हिंदी प्रतिनिधीहि सर्वथा एकमुखानेंच बोलत, असें मात्र नाहीं; पण त्यांच्या बोलण्यावरून सर्वसाधारण समज वरीलप्रमाणें होत असे येथें मात्र खरें. या भिन्न दृष्टिकोनांच्या आविष्कारास श्री. नेहरूंनीं उद्-घाटनाच्या भाषणांत आशियांतील राष्ट्रवादाचें आशियाच्या बाजूनें दिसणारें जें स्वरूप दिग्दर्शित केलें तेव्हांपासूनच सुरुवात झाली. कोरियावरील चर्चेत हे मतभेद सर्वांत अधिक स्पष्ट झाले व 'न्यू यॉर्क टाईम्स'मधील अग्रलेखानें त्यांना जागतिक प्रसिद्धि मिळवून दिली.

## आशियांतील राष्ट्रवादाचे प्रश्न

आशियांतील राष्ट्रवादाचें स्वरूप, भवितव्य व तन्निर्मित आंतरराष्ट्रीय प्रश्न यांची चर्चा करतांना दुसऱ्या महायुद्धानंतर या प्रदेशांत झालेल्या प्रचंड उलथापालथीची दखल घेणें अपरिहार्य होतें. त्यांतून हिंदुस्थान, पाकिस्तान, ब्रह्मदेश, इंडोनेशिया, व्हिएटनाम, फिलिपीन्स हीं स्वतंत्र राष्ट्रें उदयास आलीं. आग्नेय आशियांतील राष्ट्रांच्या स्वातंत्र्य-संग्रामांत जपानी चढाईनंतर मागें राहिलेल्या शस्त्रा-स्त्रांचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत आला व आजहि येत आहे. तेथील पूर्वप्रस्थापित साम्राज्य-सत्तांचा डोलाराहि जपानी चढाईमुळें खिळखिळा करण्यांत आला. योगायोग असा कीं, ही शस्त्र-सामग्री पुरविण्यांत जपानबरोबर अप्रत्यक्षपणें अमे-रिकेचाही वांटा होता. मलाया–व–इंडोचीनमध्यें अजूनहि स्वातंत्र्यसंग्राम चालूं आहे. ब्रह्मदेश–आणि–इंडोनेशियामध्यें कांहीं भागांत अंतर्गत कलहामुळें यादवी युद्धास तोंड लागलें आहे. सर्व प्रदेशांचा स्थूलमानानें विचार करतां राष्ट्रवादाचें युद्धपूर्व स्वरूप निश्चितपणें बदलूं लागलें आहे. परकीय सत्ताधाऱ्यां-विरुद्ध राष्ट्रवादाचें शस्त्र पाजळण्याचें प्रयोजन हळूंहळूं नाहींसें होऊन त्याचा रोख अंतर्गत शक्ति, संस्था व विचारपद्धति यांकडे वळूं लागला आहे. युद्धांतील पराजयानंतर जपानी राष्ट्रवादांतहि एक निराळेंच परिवर्तन चालूं आहे. आत्यंतिक राष्ट्रवादा-मुळें आपला अधःपात घडून आला या जाणिवेमुळेंच कीं काय, जपानचा कल आंतरराष्ट्रीयवादाकडे झुकूं लागलेला दिसतो. पण त्यांत राजकीय डावपेंचांचा भाग किती आणि खरोखरीची तळमळ किती हें अद्याप गूढच आहे. राष्ट्रवाद आणि साम्यवाद यांतील तेढहि कांहीं देशांत तीव्र स्वरूप धारण करूं लागली आहे. या दोन पद्धतींचा संगम घडून येणें अगदींच अशक्य नसलें तरी, रशियाच्या पुरस्कारानें चाललेल्या साम्यवादी पद्धतीशीं तद्देशीय राष्ट्र-वादाचा संघर्ष निर्माण होण्याचा संभवहि नजरेआड करतां येत नाहीं. चीनमध्यें हा प्रश्न विशेष प्रामुख्यानें कसोटीला लावला जात असून तेथील परिस्थितीवरून










दोन्ही पक्षीं अनुमानें आतापर्यंत काढण्यांत आलीं आहेत.

अमेरिका व रशिया यांच्यांतलि वितुष्टाचा परिणामहि आशियांतील राष्ट्रांवर झाल्याशिवाय राहत नाहीं. उदाहरणार्थ, हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय धोरणावर दोन्ही बाजूंनीं हल्ला करण्यांत येत आहे व त्यामुळें दोन्ही बाजूंच्या धोरणाबद्दल एक प्रकारची साशंकता येथें निर्माण झालेली दिसते. हिंदुस्थाननें दोन्ही गटांपासून अलिप्त राहण्याचें ठरविलें, त्या निर्णयामागें हिंदी परिस्थितींतील कांहीं गोष्टींची शक्ति असली पाहिजे असा विचार न करतां, केवळ आपल्या धोरणाला पाठिंबा मिळतो कीं नाहीं यावरच हिंदी धोरणाची योग्यायोग्यता ठरविण्याचा मार्ग अमेरिका व रशिया यांनीं स्वीकारल्यास त्यांच्याबद्दलची साशंकतेची भावना कमी होणें कठिण जाईल. ज्या अनेक गोष्टींत, विशेषतः आर्थिक पुनर्घटनेच्या कार्मी, अमेरिकेची मदत मिळणें व उपयुक्त ठरणें शक्य आहे त्यांतहि या भावनेमुळें अडथळे निर्माण होतात. आशियांतील देशांत ही भावना दृढमूल झाल्यास त्याचे परिणाम जागतिक राजकारणावर झाल्याशिवाय राहणार नाहींत.

नवोदित आशियाई राष्ट्रांच्या अंतर्गत व्यवस्थेबद्दल स्थूलमानानें असें म्हणतां येईल कीं, त्यांतील जनतेचा लोकशाही पद्धतीवर पूर्ण विश्वास आहे. अर्थात् या लोकशाहीचें स्वरूप पाश्चात्य लोकशाहीप्रमाणेंच राहील असें नाहीं. पण एकीकडे ही वैचारिक निष्ठा तर प्रत्यक्षांत एकपक्षीय हुकूमशाहीकडे प्रवृत्ति असा देखावाहि दिसतो. ही विसंगति नष्ट होऊन लोकशाही तत्त्वांशीं जुळणारी राज्यव्यवस्था निर्माण होण्याच्या कामीं अल्पसंख्याकांबद्दल सहिष्णुता व सामान्यपणें विरोधी पक्षांकडे सहानुभूतीनें पाहण्याची आवश्यकता या देशांत प्रामुख्यानें वाढीस लागली पाहिजे. त्या दृष्टीनें लोकमत जागृत करण्याचे प्रयत्नहि होत आहेत. या सर्व प्रदेशांत दिसून येणारा दुसरा एक प्रवाह म्हणजे समाजवादाच्या प्रसाराचा. अत्यंत बिकट अशा आर्थिक समस्या सोडविण्याचा एक प्रभावी मार्ग म्हणून समाजवादी पद्धतीकडे पाहिलें जातें. ही गोष्ट पुरतेपणीं ध्यानांत न घेतां जर औद्योगीकरणांत पुढारलेल्या पश्चिमेकडील राष्ट्रांनीं आपला भांडवलदारी दृष्टिकोन या प्रदेशांवर लादण्याचा प्रयत्न केला तर तें आंतरराष्ट्रीय संबंधांत बिघाड निर्माण करणारें धोरण ठरेल. आर्थिक समस्यांच्या संदर्भांतच या प्रदेशांतील भांडवलनिर्मितीच्या संकुचित मर्यादांचा विचार करावा लागेल. या मर्यादांमुळें आर्थिक पुनर्घटनेच्या कामीं परकीय भांडवलाची गरज निर्माण होते. जी गोष्ट भांडवलाची तीच तज्ज्ञ कारागिरांची आणि कार्यक्षम अधिकाऱ्यांची. या दोन्ही गोष्टींत आशियांतील राष्ट्रांत मोठीच उणीव आहे. ती दूर करण्यासहि परकीयांच्या मदतीची गरज लागणार.

आर्थिक प्रश्न अग्रभागीं दिसले तरी धर्म, भाषा, रूढी यांसारख्या सामाजिक व सांस्कृतिक आधाड्यांवरहि आशियांतील राष्ट्रवादाचा आविष्कार होत आहे. जुना इतिहास नव्यानें लिहिण्याची, नवीं मूल्यें निर्माण करण्याची निकड या नवोदित राष्ट्रांत दिसून येते.

आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या अशा काश्मीर, कोरिया, पश्चिम न्यू गिनी, या प्रदेशांवरून निर्माण होणाऱ्या प्रश्नांसहि आशियांतील राष्ट्रांना तोंड द्यावयाचें आहे. या प्रश्नांत केवळ त्यांचेच हितसंबंध गुंतलेले नाहींत तर इतर राष्ट्रेंहि त्यांत लक्ष घालूं इच्छितात. उदाहरणार्थ, पश्चिम न्यू गिनिच्या प्रश्नांत ऑस्ट्रेलियाला आपला हितसंबंध आहे असें वाटतें तर, कोरियाप्रकरणांत अमेरिकेच्या रूपानें सारें पाश्चात्य जगच आपलें धोरण आशियांतील जनतेच्या परीक्षणार्थ पुढें मांडीत आहे. जागतिक राजकारणांत आशियाई देशांना यापुढें उपेक्षून चालणार नाहीं याची जाणीव पाश्चात्य राष्ट्रांनाहि होऊं लागली आहे.

परिषदेच्या सुरुवातीसच वरीलप्रमाणें आशियांतील राष्ट्रवादांतून उद्भवणाऱ्या गुंतागुंतीच्या प्रश्नांचा पाढा वाचण्यांत येऊन चर्चेची दिशा निश्चित केली गेली.

## आशियाई राष्ट्रांचे तीन गट

प्रादेशिक ' गोल-मेजां 'तील चर्चेचा पहिला हप्ता राष्ट्रवादाच्या अंतर्गत प्रश्नांवर केंद्रित झाला होता. हिंदुस्थान, पाकिस्तान व सीलोन हा एक गट; आणि ब्रम्हदेश, सयाम, फिलिपीन्स, इंडोचीन व इंडोनेशिया हा दुसरा गट; आणि चीन, जपान हा










तिसरा गट. असे आशियाई राष्ट्रांचे तीन गट पाडून प्रत्येकावर वेगवेगळ्या 'गोल मेजां'त चर्चा करण्यांत आली. ही चर्चा बरीचशी माहिती मिळविण्याच्या दृष्टीनें उपयुक्त झाली; कित्येक वेळां तिला त्या त्या देशांच्या प्रतिनिधींची उलटतपासणी घेतली जाण्याचें स्वरूप आलें. ही गोष्ट त्या प्रतिनिधींच्या दृष्टीनें जरा अडचणीचीच होती; कारण प्रत्येक प्रश्नावर त्यांचीं ठाम मतें नव्हतीं व जरी असलीं तरी तीं वैयक्तिक मतें असल्यामुळें त्यांवरून काढलेलीं अनुमानें अचूक असतील अशी खात्री नव्हती. साधारणपणें निरनिराळ्या देशांतील सध्यांच्या सरकारांचें स्थैर्य, तेथील कम्युनिस्ट चळवळीचें सामर्थ्य, डाव्या व उजव्या गटाची संघटना व त्यांचें धोरण, आर्थिक परिस्थिति, परकीयांकडून होणारी मदत इत्यादि मुद्द्यांवर चर्चा करण्यांत आली. हिंद-व-पाकमधील आर्थिक परिस्थिति फारशी समाधानकारक नाहीं व त्यावर उपाययोजना केल्याशिवाय दोन्ही देशांतील घडामोडी अराजकाच्या मार्गावर जाण्याचें टळणार नाहीं या मुद्द्यावर बहुतेक प्रतिनिधींचें एकमत होतें. तसेंच येथील कम्युनिस्ट चळवळ फारशी जोर धरूं शकत नाहीं व जोंपर्यंत राष्ट्रीय चळवळीशीं ती एकरूप होत नाहीं तोंपर्यंत तिच्यापासून कांहीं निष्पन्न होणार नाहीं याबद्दलहि एकवाक्यता दिसून आली. लोकशाहीच्या दृष्टीनें प्रचलित सरकारला विरोधी असा पक्ष स्थापन होण्याची आवश्यकता प्रतिपादन करण्यांत आली. परंतु हा पक्ष डाव्या गटाकडून कार्य करील कीं उजव्या गटाकडून याबद्दल दुमत झालें. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या तीन वर्षांत हिंदी सरकारच्या आर्थिक धोरणांतील चढउतार विचारांत घेण्यांत आले. नजीकच्या भविष्यकाळांत तरी भांडवल उभारण्याच्या दृष्टीनें फारशी प्रगति होईल असें दिसत नसल्याचें मत व्यक्त करण्यांत आलें. अमेरिका व ब्रिटन यांजकडून भांडवल मिळविण्याच्या मार्गांतील अडचणी दूर झाल्याशिवाय आर्थिक आघाडीवरील नैराश्य नाहींसें होणार नाहीं, असाच सूर उमटला. भांडवली मदतीची चर्चा दुसऱ्या एका 'गोलमेजां'त बरीच विस्तृत झाली. या सबंध क्षेत्रासंबंधी विचार करून पुढील चार अटींवर अमेरिकेकडून मदत मिळण्यास हरकत असूं नये या मुद्द्यावर तेथें एकमत झालें : (१) ज्या कामावर भांडवल खर्च व्हावयाचें तें पूर्वनियोजित असावें, (२) तांत्रिक देखरेख किंवा जरूर तेथें प्रत्यक्ष तांत्रिक मदतहि भांडवलाबरोबर येऊं द्यावी, (३) जसजशी कामाची प्रगति होईल त्या प्रमाणांत कांहीं कालावर विभागून भांडवली कर्जें देण्यांत यावीत, (४) भांडवलापैकीं कांहीं भाग स्थानिक सरकारनें खासगी व्यक्तींच्यामार्फत अथवा अन्य तऱ्हेनें उभा करावा. या अटींमुळें भांडवल योग्य प्रकारें खर्च केलें जाईल पण त्याचबरोबर त्या त्या देशांचें राष्ट्रीय स्वातंत्र्य अबाधित राखलें जाईल.

दुसऱ्या गटांतील देशांत इतकी भिन्न भिन्न परिस्थिति आहे कीं त्यांचेसंबंधीं सर्वसाधारणपणें सर्वांना लागूं होतील अशीं विधानें करणें कठिण आहे. मलाया-आणि-इंडोचीनबाबत चर्चेंत बरेच मतभेद दिसून आले. ब्रिटिश प्रतिनिधींच्या मतानें मलायांतील कम्युनिस्टांस जनतेचें कोठलेंहि पाठबळ नसून केवळ शस्त्रास्त्रांच्या जोरावर जनतेला घाबरवून सोडून ते आपली गुजराण करीत आहेत. राजकीय प्रश्न सुटण्याच्या मार्गांतील मुख्य अडचण मलायांतील चिनी, मलायी व हिंदी जनतेचें जवळजवळ समसमान संख्याबल व मलायी नागरिकत्वाच्या कल्पनेचा अभाव असें सांगण्यात आलें. परंतु मलायांतील बंडखोरांविरुद्ध मोठ्या प्रमाणांत केली जाणारी लष्करी कारवाई, नागरिकस्वातंत्र्यावर घातलेले कडक निर्बंध आणि मळेवाल्यांच्या हितसंरक्षणार्थ चाललेली धडपड या गोष्टींची संगति वरील विधानांशीं लावणें शक्य झालें नाहीं. इंडोचीनबद्दलहि कांहींसा तोच प्रकार झाला. फ्रेंच व इंडोचीनचे प्रतिनिधि बाओ दाईचा पाठपुरावा करणारे असल्यामुळें दुसऱ्या बाजूस चाललेल्या घडामोडींबद्दल सत्य स्थिति पुढें आली नाहीं. मात्र हो-चि मिन्हच्या मागें बरीच इंडोचिनी जनता आहे, फ्रेंच व हो यांच्यांतील वाटाघाटी फिसकटण्यास फ्रेंचच कारणीभूत होते, बाओ दाई हें फ्रेंचांच्या हातचें उघड उघड बाहुलें आहे, हे मुद्दे इतर प्रतिनिधींना मान्य झालेले दिसले. सबंध आग्नेय आशियांतील मुलखांत इंडोचीनमधील स्थिति सर्वांत अधिक स्फोटक आहे व तेथील घडामोडींचा परिणाम या










संबंध क्षेत्रावर होईल अशी विचारसरणी प्रकट झाली. या क्षेत्रांतील सर्व देशांतून असणाऱ्या चिनी प्रजाजनांची संख्या, त्यांच्यांतील एकजूट, त्यांची आर्थिक सुस्थिति आणि चीनशीं असलेली त्यांची निष्ठा यांमुळें एक महत्त्वाचा वांशिक प्रश्न निर्माण झाला असून या जवळजवळ एक कोटी जनतेस त्या त्या प्रदेशांतील जनतेंत सामावून घेण्यासाठीं काय केलें पाहिजे याबद्दल बराच विचार झाला. चिनी लोकांविषयीं सर्वत्र परकेपणाची भावना आहे व त्यामुळें त्यांस नागरिकत्वाचे हक्क देण्यास बराच विरोध आहे. एकंदर चर्चेचा निष्कर्ष असा निघाला कीं, समान नागरिकत्वाचे हक्क चिनी लोकांना देणें आणि उलट पक्षीं चिनी लोकांनीं त्या त्या प्रदेशाशीं समरस होऊन नागरिकत्वामुळें येणाऱ्या जबाबदाऱ्या पार पाडण्याची तयारी दाखविणें या दोनच उपायांनीं हा प्रश्न सुटूं शकेल.

जपानमधील परिस्थिति महायुद्धानंतर पूर्णपणें बदलली असली तरी, अमेरिकेच्या लष्करी आधिपत्याची समाप्ति होतांच पुनः पूर्वपदावर गाडी येणार नाहींच याबद्दल खात्री देतां येत नाहीं. वाढलेली लोकसंख्या, उद्योगधंद्यांची पुनर्घटना थोपवून धरलेली, चीनशीं असलेला व्यापार जवळ जवळ संपुष्टांत आलेला—या कारणांमुळें जपानची आर्थिक परिस्थिति बिकट झालेली आहे. जपानी प्रतिनिधींच्या मतें शक्य तितक्या लवकर तेथील उद्योगधंदे पुनर्घटित केल्याशिवाय आणि खुल्या व्यापाराचें तत्त्व अवलंबिल्याशिवाय त्यांचा प्रश्न सुटणार नाहीं. परंतु ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड यांचा जपानी औद्योगीकरणाला बराच विरोध आहे. इतिहासाची पुनरावृत्ति होईल अशी त्याना भीति वाटते. राजकीय दृष्ट्या जपानमध्यें मोठेंच स्थित्यंतर घडून आलेलें असलें तरी, त्याच्या टिकाऊपणाबद्दलहि शंका व्यक्त करण्यांत आली. चीनचा कोणीच प्रतिनिधि नसल्यामुळें चर्चेस थोडें वैगुण्य आलें असलें तरी चीनमधील घडामोडी प्रत्यक्ष अवलोकन केलेले इतर प्रतिनिधी हजर असल्यामुळें बरीच उद्बोधक चर्चा झाली. लाल चीनचें सरकार सर्व दृष्टींनीं चँग-कै-शेकच्या सरकारपेक्षां अधिक कार्यक्षम व हितकर आहे याबद्दल एकवाक्यता दिसून आली. अमेरिकन प्रतिनिधींनींहि ही गोष्ट मान्य केली. चिनी सरकार आपलें स्वतंत्र धोरण ठरवील, कीं रशियाच्या हाताला सदैव हात लावीत राहील, या प्रश्नावर बराच मतभेद झाला असला तरी अंतर्गत धोरणांत सध्यां तरी चिनी सरकार परिस्थित्यनुसार पावलें टाकीत आहे, केवळ रशियन नमुन्याची नक्कल उठविण्याचा प्रयत्न करीत नाहीं, या मुद्द्यावरहि एकवाक्यता आढळून आली. चीनच्या यूनोप्रवेशाबद्दल एक छोटीशी पण कडाक्याची चर्चा झाली. अर्थात् ती अनिर्णीत राहिली हें सांगणें न-लगे.

### राजकीय व आर्थिक प्रश्न

दुसऱ्या हप्त्यांत राजकीय व आर्थिक आणि सामाजिक प्रश्नांवर दीर्घ चर्चा झाली. आंतरराष्ट्रीय संबंधांच्या अनुषंगानेंच ही चर्चा व्हावयाची असल्यामुळें प्रत्येक देशाच्या प्रतिनिधीस कांहीं तरी सांगण्यासारखें होतेंच. रशिया आणि अमेरिका यांच्यांतील संघर्षांत आशियांतील राष्ट्रांचें स्थान व धोरण हा प्रश्न राजकीय 'गोलमेजां'त साहजिकच प्रमुखपणें चर्चिला गेला, तर अमेरिकेकडून मिळणें शक्य असलेल्या भांडवली व तांत्रिक मदतीचा प्रश्न दोन्ही आर्थिक 'गोल-मेजां'त प्रामुख्यानें पुढें आला. आशियांतील राष्ट्रांत पाश्चात्यांबद्दलची विरोधी भावना आतां मुख्यतः अमेरिकेविरुद्ध वळलेली दिसते, तर रशियानें आपल्या देशांत घडवून आणलेल्या आर्थिक आणि सामाजिक प्रगतीमुळें त्याबद्दल तेथील जनतेला बरेंच आकर्षण वाटतें ही गोष्ट नमूद करण्यांत आली. या भावनाच्या कारणमीमांसेस चर्चेंत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें. पाश्चात्यांचें धोरण चढाईचें, पिळणुकीचें, आशियांतील राजकारणाचा उपयोग केवळ स्वतःच्या फायद्यासाठीं व रशियाच्या नायनाटासाठीं करून घेण्याचें आहे ही समजूत आशियांतील देशांत सर्वत्र पसरलेली आहे, असें दिसून आलें. त्याचबरोबर आर्थिक मदतीसाठीं पाश्चात्यांकडे पाहिल्याशिवाय गत्यंतर नाहीं, पण राष्ट्रीय स्वातंत्र्याला बाध न येतां मिळाल्यासच ती हवी, अशी त्यांची विचारसरणी आहे. पाश्चात्य प्रतिनिधींच्या मतें, पूर्व–पाश्चिम गैरविश्वासाचें कारण पाश्चात्यांविषयींचे गैरसमज असून








ते दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे; अमेरिकेनें केवळ राजकीय प्रश्नांवरच आपलें लक्ष केंद्रित केलेलें नसून आशियाच्या आर्थिक पुनर्घटनेच्या कार्याला हातभार लावण्याचेंहि ठरविलें आहे ही गोष्ट नजरेआड होऊं देतां कामा नये. रशियाकडे पाहण्याचा आशियांतील राष्ट्रांचा दृष्टिकोनहि पाश्चात्यांना पुरेसा समजलेला नाहीं, त्यामुळें आशियांतील देशांविषयीं त्यांच्या मनांत गैरसमज आहे, हा मुद्दाहि विस्तारानें पुढें मांडला गेला. राष्ट्रीय स्वातंत्र्य व आर्थिक उन्नति या दोन गोष्टींचें महत्त्व आशियांतील राष्ट्रांना पूर्णपणें पटलें असल्याळें कम्युनिझमला थोपवून धरण्यासाठीं दुसऱ्या देशांच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यावर घाड घालण्याचें पाश्चात्यांचें धोरण येथें त्याज्य ठरतें. रशियन धोरण राष्ट्रीय स्वातंत्र्याला पोषक अशा चळवळींना उत्तेजन देण्याचें असल्यामुळें त्याबद्दल इतकी चीड येत नाहीं, ही गोष्ट स्पष्ट करण्यांत आली. हिंदुस्थानच्या 'तटस्थते'च्या परराष्ट्रीय धोरणावर खडाजंगीची चर्चा झाली. संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या सभासदत्वाशीं तटस्थतेची भूमिका विसंगत असल्याचें मत पाश्चात्य प्रतिनिधींनीं जोरानें पुढें मांडलें. हिंदी तटस्थतेच्या व्याप्तीबद्दल हिंदी प्रतिनिधींनीं तितक्याच स्पष्टपणें उत्तर देऊन आपल्या भूमिकेचें समर्थन केलें. कोरियासाठीं नेमलेल्या यूनोच्या कमिशनवर हिंदी सरकारनें जागा नाकारली ही गोष्ट 'यूनोशीं असहकार' करण्यासारखी आहे, लोकशाहीशी विसंगत आहे वगैरे टीका अमेरिकन प्रतिनिधींनीं केली; परंतु लोकशाही पद्धतींतहि विरोधाला स्थान असतें, व विरोधी भूमिकेमुळें जर एखाद्या सभासदाला विशिष्ट समितीवर काम करणें अशक्य वाटलें तर तो लोकशाहीला विरोध ठरत नाहीं ही गोष्ट हिंदी प्रतिनिधींनीं प्रामुख्यानें पुढें मांडली. काश्मीरचा प्रश्नहि चर्चेस निघाला होता. त्यावर पाकिस्तान वहिंद यांनीं आपापल्या भूमिका मांडल्या.

रशियाकडून भांडवली मदत मिळविण्यांत आशियाई राष्ट्रांना फारसें यश येणार नाहीं असा निष्कर्ष आर्थिक चर्चेंत निघाला. स्थानिक भांडवल बेताचें, आंतरराष्ट्रीय बँक वगैरे संस्थांकडून मदतीची फारशी आशा करण्यास जागा नाहीं, इतर देशांकडूनहि अपेक्षा करणें व्यर्थ ठरणार—यामुळें अमेरिकेकडूनच भांडवली मदत मिळाली पाहिजे, ही गोष्ट स्पष्ट होती. पण अमेरिकेकडून यावयाचें भांडवल खाजगी रीतीनें येण्याच्या मार्गांतील एक अडचण म्हणजे येथील सरकारचें समाजवादाकडे झुकणारें धोरण व त्याबद्दल अमेरिकन भांडवलदारास वाटणारी भीति. दुसरी अडचण अशा भांडवलावर आवश्यक असलेला १५ ते ३० टक्के फायदा ! इतक्या महागाईनें हें भांडवल आणावयाची ताकद आशियांतील देशांत नाहीं. तेव्हां खासगी भांडवलावर विसंबून न बसतां सरकारी रीतीनें येणाऱ्या भांडवलावरच लक्ष केंद्रित केलें पाहिजे. तसें भांडवल येण्याच्या मार्गांत राजकीय अडचणी आहेत व त्यापैकीं मुख्य म्हणजे अमेरिकन जनतेला आशियाई देशांच्या भवितव्याबद्दल खात्री वाटत नाहीं. चीनचा अनुभव ताजा असल्यामुळें त्याचीच पुनरावृत्ति इतरत्र होईल कीं काय अशी तेथें भीति वाटते. पण आर्थिक मदत दिली नाहीं तर आशियावर कम्युनिझमची पकड बसेल ही भीतिहि अमेरिकनांस वाटतेच. त्यामुळें त्यांचीं मनें भांबावून गेलीं आहेत. भांडवली मदत स्वीकारण्याची 'तयारी' सर्व देशांत आढळून येत नाहीं. कारण त्यासाठीं लागणारे तज्ज्ञ व कसबी कारागीर तेथें नाहींत, असें अमेरिकन प्रतिनिधींनीं सांगितलें. पण भांडवल म्हणजे निवळ यांत्रिक भांडवलच नाहीं; मोठमोठीं पण दीर्घकालानें फलदायी होणारीं पाटबंधाऱ्यासारखीं कामें अंगावर घेण्यासाठीं तेवढ्या मुदतींत लागणाऱ्या अन्नवस्त्रादि वस्तूंचीहि गरज असते; ती भागविणें ही देखील भांडवली मदत होऊं शकते, हा मुद्दा हिंदी प्रतिनिधींनीं पुढें मांडला. आर्थिक प्रश्नांतूनहि राजनैतिक प्रश्नाची उत्पत्ति झाली व आशियांतील देशांच्या परराष्ट्रीय धोरणावर राजकीय 'गोलमेजा'त झालेल्या चर्चेचीच छोटी आवृत्ती आर्थिक 'गोल-मेजां'तही निघाली.

### आंतरराष्ट्रीय खेळीमेळीचें छोटें प्रात्यक्षिक

याप्रमाणें आशियांतील राष्ट्रवादामुळें निर्माण होणाऱ्या अनेक प्रश्नांवर मोकळेपणानें चर्चा होऊन बारा दिवसपर्यंत चाललेली ही परिषद् समाप्त झाली. परिषदेचे अध्यक्ष पं. कुंझरू यांनीं समारोपाच्या










## लखनौची पॅसिफिक-संबंध-परिषद्

भाषणांत म्हटल्याप्रमाणें निरनिराळ्या देशांतील अभ्यासू व जिज्ञासू लोकांस एकत्र आणून परस्परांच्या परिस्थितीसंबंधीं मोकळेपणानें चर्चा घडवून आणण्याचें कार्य लखनौ–परिषदेनें पार पाडलें. पण चर्चेसाठीं जमून केलेल्या चर्चेबरोबर अनौपचारिक रीत्या, खातां–जेवतांना, हिंडतां–फिरतांना झालेल्या असंख्य संभाषणांनाहि परिषदेच्या कार्यांत महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. विविध देशांत आणि विविध क्षेत्रांत वावरणाऱ्या मंडळींनीं एकत्र येऊन खेळीमेळीनें जवळ जवळ दोन आठवडेपर्यंत एका ठिकाणीं राहणें म्हणजे एकप्रकारचें शिक्षणच घेण्यासारखें आहे. परस्परांच्या संस्कृतीविषयींचे गैरसमज दूर होण्यास अशा मेळाव्यांचा निःसंशय उपयोग होतो. कोणास आवडो वा न आवडो, पण जगांतील सर्व राष्ट्रांचे नागरिक एकाच भयानक युद्धव्यथेनें गांजून गेलेले आहेत. परस्परांत विश्वास व सहकार्य प्रस्थापित करणें हा एकच उपाय त्यावर सुचलेला आहे. तो प्रत्यक्षांत येऊं शकेल याचें एक अत्यंत छोटेसें पण आशादायी प्रात्यक्षिक लखनौ-परिषदेच्या निमित्तानें एकत्र जमलेल्या प्रतिनिधींना मिळालें, असें म्हटल्यास चालेल.

---

## प्रलय-प्रभव

| | |
|---|---|
| जडांतील<br>अेक अणू<br>अणू अणू<br>साधा अणू १ | जीवांतील<br>अेक अणू<br>अणू अणू<br>साधा अणू १ |
| अणू आंत<br>विश्वें सात<br>अणू आंत<br>वज्राघात २ | अणू आंत<br>विश्वें सात<br>अणू आंत<br>जगन्नाथ २ |
| विभाजन<br>संयोजन<br>संयोजन<br>विभाजन ३ | विभाजन<br>संयोजन<br>संयोजन<br>विभाजन ३ |
| फुटे अणू<br>अुठे रण<br>दारीं अुभा<br>प्रभंजन ४ | फुटे अणू<br>अुठे मन<br>दारीं अुभें<br>संजीवन ४ |

—देवदत्त दाभोलकर

## काल आणि आज

काल आणि आज
युगांतिल दोन बिंदू.
त्यांतच गटांगळ्या खात
तुम्ही आम्ही हिंडूं !
आजचा क्रम, यथाक्रम
कालच्या पुढें कोटिक्रम.
कालचीच नक्कल आज
तिचाच ' रीप्रिंट ' उद्यां !
थांबा, चुकलों सांगण्यांत.
कालच्या पुढें आजची रंगत
' प्रगतीसाठीं परागतीची
अगदीं अनिवार्य संगत' !
कालच्याच चुका आज पुनः
हेवेदावे स्पष्ट अभ्यासून—
कालचेच दुष्टावे आज अन् उद्यां
निरंतर उभे ' आ ' वासून.
कालचेंच मौर्ख्य सहीन् सही
जमेच्या बाजूला आजही
शतकें येतील आणि जातील
शिगेल आमचें मौर्ख्यहि !

—मधुकर जावडेकर

प्रा. म. गो. भाटे

# कलावंत जॉर्ज बर्नार्ड शॉ

जॉर्ज बर्नार्ड शॉ ९५ वर्षांचा होऊन नुकताच दिवंगत झाला. त्याच्या प्रदीर्घ वाङ्मयीन जीवनांत उसळलेल्या अनेक वादवादळांचीं आंदोलनें अद्यापि विरून गेलेलीं नाहींत. पाश्चात्यांच्या सामाजिक जीवनाच्या अंगोपांगांवर व त्यांच्या मध्यवर्ती रूढीं-वर व श्रद्धांवर शॉ यानें केलेल्या टीकेचा तिखटपणा व विखार अद्यापि उतरलेला नाहीं. मूर्तिभंजक शॉनें छिन्नविछिन्न केलेल्या रूढकल्पनांचीं व पूर्वसंस्कारांचीं छकलें अद्याप पाश्चात्य विचारवंताच्या बुद्धीला सलत आहेत. शॉच्या नाटकांतील ज्वालाग्राही घटना वाचक-प्रेक्षकांच्या स्मृतींत अद्यापि स्फुरत आहेत. संवादांची आतषबाजी त्यांच्या मनश्चक्षूंना दिपवीत आहे, कल्पनांची कसरत त्यांची अक्कल गुंग करीत आहे; शॉच्या नाटकांचें स्थायी मूल्यमापन करण्यास आवश्यक असणारा समतोलपणा व निर्विकारपणा हीं अद्यापि उपलब्ध नाहींत. टीकाकाराचें लक्ष अ-निवार्यपणें नाटकांतील सामाजिक व तात्त्विक सिद्धांतां-वरच वेधलें जातें व नाटकांच्या कलात्मकतेला गौणत्व मिळतें. नाटकें कलाकृति नसून राज्य—अर्थ—समाज-कारणांवरील प्रबंध आहेत अशा भावनेनें समालोचिलीं जातात. पण शॉनें स्वतःला इंग्रजी नाट्य-वाङ्मयांत महत्त्वाचें स्थान असल्याचा पुकारा केला व आपलीं नाटकें शेक्स्पियरच्या नाटकापेक्षां कित्येक बाबतींत सरस असल्याचा ("Better than Shakespeare") दावा मांडला. प्रचलित टीकालेखांत व प्रबंधांतहि शॉला जगाच्या वाङ्मयांत मानाचा क्रमांक दिला गेलेला आहे. आणि म्हणूनच त्याच्या नाटकांचें वाङ्मयीन कला-त्मक दृष्ट्या मूल्यमापन करणें, निदान तसा प्रयत्न करणें, अगत्याचें आहे. शॉच्या नाटकांचे विषय आज-च्या जगाला प्रस्तुत व जिव्हाळ्याचे वाटत असल्यामुळें त्या नाटकांना प्राप्त झालेलें नैमित्तिक महत्त्व उद्यांच्या जगांत टिकेलच असा भरंवसा नाहीं. पण शॉचीं नाटकें सॉफोक्लीज, कालिदास व शेक्स्पियर यांच्या नाटकांप्रमाणें त्रिकालाबाधित कलाकृती आहेत असें सिद्ध झाल्यास त्यांना प्राप्त होणारें महत्त्व नित्य व टिकाऊ ठरेल. खुद्द शॉलाहि ही सुवर्णतुला मान्य होती हें त्यानें शेक्स्पियर, मोलियर, गइट (Goethe) इत्यादि पाश्चात्य वाङ्मयांतील मोहोऱ्यांशीं स्वतःची जी वारंवार तुलना केली, तीवरून उघड आहे.

### वाङ्मयीन यशाबरोबर आर्थिक यश

शॉच्या वाङ्मयीन कार्याला १८७९ मध्यें कादंबरीलेखनानें सुरुवात झाली व तें कार्य अव्याहत-पणें सत्तर वर्षें चालू होतें. त्याचा वाङ्मयसंभार समृद्ध व विपुल होता. जवळजवळ ५० नाटकें किंवा नाट्यप्रवेश, ५ कादंबऱ्या, दोनतीन नाट्य-टीकेचे ग्रंथ, कांहीं समाज—राज्य-शास्त्रांवरील निबंध व प्रबंध, नाटकांना जोडलेल्या प्रबंधवजा प्रस्तावना इतक्या लेखांचा त्यांत समावेश होतो. हें सर्व लेखन करीत असतांना, शॉनें धंदेवाईकपणा कधींच पत्करला नाहीं. लोकमताला भिऊन आपल्या मतांना व टीकांना कधींच मुरड घातली नाहीं; केवळ शिष्टाचार म्हणून वाङ्मयीन संकेतांचा व रूढींचा अवलंब केला नाहीं. लेखनाकरितां लेखन, भाषा-विलासाकरितां लेखन, शिळोप्याच्या गप्पा या स्वरूपाचें लेखन त्यानें केलें नाहीं. आपल्याला कांहीं तरी सांगावयाचें आहे, कांहीं मतांचा व










तत्त्वांचा पुरस्कार करावयाचा आहे, कांहीं लोकभ्रमांचा निरास करावयाचा आहे अशा जाणिवेनें तो लेखणी हातांत घेत असे. 'मनःपूतं समाचरेत्' हा निष्ठावंत वाङ्मयसेवकाचा दंडक त्यानें निष्ठेनें पाळला व वाङ्मयाची प्रतिष्ठा संभाळली. आपल्याला महत्त्वाचें वाङ्मयीन कार्य करावयाचें आहे ही जाणीव व तें कार्य करण्याचें सामर्थ्य आपल्याजवळ आहे हा आत्मविश्वास शॉला वयाच्या सतरा–अठराव्या वर्षी आला. त्या कार्याला स्वतःला वाहून घेतां यावें म्हणून त्यानें व्यापारी जगांतील बढतीची नोकरी सोडून स्वेच्छेनें बेकारी व गरीबी पत्करली. इंग्रजी भाषेंतून प्रसूत व प्रसृत होणाऱ्या वाङ्मयाचें केंद्र लंडन हें असल्यामुळें शॉनें आपल्या मायभूमीचा (आयर्लंडचा) किनारा १८७६ मध्यें सोडला व लंडनमध्यें वास्तव्य केलें. तेथेंहि त्यानें नोकरीच्या विलोभनापासून अलिप्त राहून, लक्तऱ्या झालेले कपडे व फाटके बूट घालून सात-आठ वर्षें वाङ्मयीन तपश्चर्या केली. आपल्या प्रक्षोभक व रूढिभंजक मतांचा वाङ्मयीन पुरस्कार करीत करीतच त्यानें १८८५ च्या सुमारास आर्थिक स्वातंत्र्य व स्थैर्य मिळविलें आणि 'अधिकस्य अधिकं फलम्' या न्यायानें आर्थिक यश व वाङ्मयीन यश हीं एकमेकांना पूरकच ठरलीं. शॉनें पैशाकरितां लिहिलें नाहीं हें खरें, पण जें लिहिलें त्याचें मोल जनतेला बौद्धिक चलनांतच नव्हे तर आर्थिक चलनांतहि पटवून दिलें.

### वाङ्मय हें तत्त्वदर्शनाचें साधन

शॉचें वाङ्मयीन मूल्यमापन करतांना त्यानें केलेली वाङ्मयाची व्याख्या लक्षांत घेणें जरूर आहे. वाङ्मय हें तत्त्वप्रतिपादनाचें साधन आहे, लेखक हा तत्त्ववेत्ता (artist-philosopher) असला पाहिजे, एखाद्या पुस्तकाचें कलामूल्य ठरवितांना त्यांतील तत्त्वप्रतिपादनाला प्राधान्य दिलें पाहिजे[१] लेखनशैली ही रिकामपणाची कामगिरी (parlour game) नसून लेखकाच्या तत्त्वदर्शनाची मूर्तिमंत रेखीव स्पष्टता आहे,[२] या विधानांवरून शॉच्या लेखनाची बैठक स्पष्ट होते. 'कलेकरितां कला' हा सिद्धान्त त्याला मान्य नव्हता. कला ही तत्त्वदर्शी (didaclic) आहे या सिद्धान्ताच्या पायावर त्यानें आपली वाङ्मयीन रचना उभारली. वर उल्लेखिलेल्या "अर्पणपत्रां"त तो लिहितो कीं, "केवळ कलेकरितां मी एक वाक्य देखील लिहिण्याचा खटाटोप करणार नाहीं"[३]

त्यानें जें जें लिहिलें तें सर्व विशिष्ट मतप्रणालीचा व जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करण्याकरितां लिहिलें. त्या तत्त्वज्ञानाची व्याप्ति फार मोठी होती. विश्वव्यापाराचें स्वरूप व त्यांत मानवी जीवनाचें स्थान यांचें शास्त्रशुद्ध समालोचन करून नाट्यवाङ्मयाच्या द्वारें तें तत्त्वज्ञान विचारवंतांपुढें व सामान्यांपुढेंहि मांडावें ही शॉची आकांक्षा होती. शॉचीं नाटकें या आकांक्षेचा परिपाक आहेत. आणि म्हणूनच तो आपल्या नाटकांची तुलना शेक्स्पियरच्या शोकांतिका, बन्यन्‌ची अध्यात्मकथा, नीत्शेचे तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ, डार्विनचें जीवशास्त्रविषयक लेखन व कार्ल मार्क्सचें समाज-अर्थ-शास्त्रीय भांडवल (Das Kapital) या ग्रंथांशीं

---

1 "The main thing in determining the artistic quality of a book is not the opinions it propagates, but the fact that the writer has opinions"
—"Epistle Dedicatory", Man and Superman.

2 "Effectivenss of assertion is the Alpha and Omega of style. He, who has nothing to assert, has no style and can have none; he, who has something to assert, will go as far in power of style, as its momentousness and his conviction will carry him"—Ibid.

3 "But 'for art's sake' alone I would not face the toil of writing a single sentence"

करतो. वाङ्मयीन टीकाकाराच्या दृष्टीला आमूलाग्र भिन्नप्रकृति दिसणाऱ्या या लेखनकृतींत शॉला आढळणारें साम्य म्हणजे त्यांतील जिवंत व प्रभावी तत्त्वप्रतिपादन. अर्थात् उत्क्रांतिवादी शॉला हें मान्य आहे, कीं कालचें तत्त्वज्ञान जसें आज अपुरें वाटतें तसें आजचें उद्यां अपुरें वाटेल; पण तत्त्वें जुनींपुराणीं झालीं तरी तत्त्वप्रतिपादनाची शैली व कलामूल्यें जिवंत व अबाधित राहूं शकतात. डार्विननें बायबलमधील विश्वोत्क्रांतिदर्शन खोटें पाडलें; पण बायबलची लेखनशैली लटकी पाडली नाहीं. शॉ जेव्हां शेक्स्पियर आणि बन्यन् यांची तुलना करतो व बन्यनला श्रेष्ठपद देतो, तेव्हां तो कबूल करतो कीं, प्रत्येकाची लेखनशैली त्याच्या तत्त्वज्ञानाचा आविष्कार करण्यास समर्थ अशी आहे. दोघेहि जातिवंत व प्रभावी तत्त्वज्ञ लेखक आहेत. पण बन्यन्चें तत्त्वज्ञान शेक्स्पियरपेक्षां व्यापक व विश्वरूपदर्शक असल्यामुळें बन्यनचें वाङ्मयीन स्थान श्रेष्ठ आहे.

## शॉ आणि शेक्स्पिअर

शॉच्या वाङ्मयविषयक तत्त्वज्ञानाची ही बैठक लक्षांत घेतली म्हणजे तो आपल्या नाटकांत काय साधण्याचा प्रयत्न करीत होता, तें कळून घेण्यास सोपें पडेल. मानवी जीवनाचें स्वरूप, व्यापार व ध्येयें यांची एक नवी उपपत्ति लावण्याची व विश्वव्यापारांतील मानवी जीवनाचें स्थान ठरविण्याची त्याची मनीषा होती. त्याच्या नाटकांत सामाजिक रूढींवर व संस्थांवर विदारक टीका असली, व व्यक्तींच्या स्वभावदोषांची मूलगामी चिकित्सा असली तरी दोषदिग्दर्शन हा त्यांचा मुख्य हेतु नाहीं. निदान असें तरी म्हटलें पाहिजे कीं, ज्या पातळीवरून ही गुणदोषचिकित्सा होत होती ती पातळी सामाजिक सुधारणेची नसून विश्वस्पर्शी तत्त्वज्ञानाची होती. आणि म्हणूनच ज्या कालमानावर तो विश्वोत्क्रांतीची गणना करीत होता, तें कालमान दशकांचें किंवा शतकांचें नसून युगांचें होतें. अर्थात् सर्वच नाटकांत हा विश्वस्पर्शी दृष्टिकोन वापरला आहे असें नाहीं. त्याचें पहिलेंच नाटक "विधुरांचीं घरें" (Widowers' Houses) हें घेतलें तर त्यांत समाजवादाच्या आश्रयानें भांडवलशाही समाजव्यवस्थेवर व त्या समाजांत ग्राह्य मानलेल्या नीतिकल्पनांवर हल्ला चढविलेला दिसतो. गलिच्छ वस्तींतील जुनीं पडकीं घरें विकत घेऊन त्यांत गरीब भाडेकरू भरावयाचे व त्यांच्याकडून भाडें उकळून गबर व्हावयाचें हा धंदा करणाऱ्या घरमालकांचें (Slum-Landlords) चित्र त्यांत रेखाटलें असून या धंद्याची व्यावहारिक व नैतिक चिकित्सा केलेली आहे. नाटकाला जोडलेल्या प्रस्तावनेंत शॉनें म्हटल्या प्रमाणें नाटकाचा उद्देश नीतिशिक्षणात्मक, विचारप्रवर्तक, प्रचारात्मक आहे.[४]

अर्थात्, नाटकामुळें हें लोकशिक्षणाचें कार्य व्हावयाचें असेल तर, नाटक प्रथमतः लोकरंजनदृष्ट्या यशस्वी व्हावयाला पाहिजे, हा व्यावहारिक कार्यकारणभाव शॉला मान्य आहे व म्हणूनच आपलें नाटक प्रयोगदृष्ट्या व तंत्रदृष्ट्या परिणामकारक आहे ('a technically good practicable stage play'), लोकरंजनाचें प्रभावी साधन आहे. असा त्याचा दावा आहे. नाटकाची प्रायोगिक यशस्विता क्षणभर गृहीत धरून त्याचें मुख्य प्रयोजन जें विचारप्रवर्तनद्वारां लोकशिक्षण, त्या दृष्टीनें नाटकाची छाननी केली असतां आढळून येईल कीं, संवादांच्या विनोदगर्भ चटकदारपणामुळें व केवळ तर्कबुद्धीलाच केलेल्या आवाहनामुळें, नाटकांत केलेल्या सामाजिक दोषचिकित्सेंत वाचक-प्रेक्षकांचें मनःस्वास्थ्य ढांसळून टाकून त्यांना सामाजिक अन्यायांबद्दल आंच लावण्याचें, त्यांच्या मनांत घृणा उत्पन्न करण्याचें सामर्थ्य नाहीं. विचारांना प्रभावी जिवंतपणा यावयाचा असेल तर ते पोटतिडिकींतून स्फुरले पाहिजेत, "Great thoughts come from the heart" या मोर्लेच्या उक्तींतील सत्य निकषाप्रमाणें वापरलें तर असें आढळून येईल कीं बेन जॉन्सन, शेक्स्पियर इत्यादिकांच्या नाटकांत प्रामुख्यानें अगर अनुषंगानें केलेली सामाजिक टीका शॉच्या नाटकांतील टीकेपेक्षां जास्त प्रभावी

4 'It is a propagandist play—a didactic play—a play with a purpose.'










आहे. प्रस्तुत नाटकांतला घरमालक सार्टोरियस, बेन-जॉन्सनचा व्होल्पोन व शेक्सपियरचा शायलॉक हीं सर्व पात्रें सामाजिक विचारप्रवर्तनाला कारक व्हावींत म्हणून निर्मिलेलीं आहेत. पण सामाजिक व वैयक्तिक स्वार्थांधता, निर्दयपणा, आधिभौतिकता या माणुसकीला काळिमा आणणाऱ्या दोषांबद्दल व वृत्तींबद्दल चीड उत्पन्न करणें, हे दोष कसे उखडून टाकतां येतील व एक निर्दोष समाजरचना व व्यक्तिचारित्र्य कसें घडवितां येईल याबद्दल वाचकाला विचारप्रवण व कार्यप्रवण करणें, हा प्रचारक वाङ्मयाचा प्रमुख उद्देश लक्षांत घेऊन या विविध पात्रांच्या परिणामकारकत्वाची तुलना केली तर, सार्टोरियस हें पात्र निष्प्रभ ठरेल. आणि याचें मुख्य कारण शॉच्या शब्दयोजनेची व भाषाप्रयोगाची थंडप्रकृति तार्किकता. ज्या शब्दशक्तींच्या बळावर कवीला वाचकाच्या मनोवृत्ती हालवून त्याच्या मनश्चक्षूंना दिव्य दृष्टि देतां येते, त्याला सत्याचा साक्षात्कार घडवितां येतो, त्या काव्यमय, हृदय-स्पर्शी शब्दशक्तींवर शॉचें प्रभुत्व नाहीं, त्या प्रक्षोभक ( emotive ) शब्दशक्तींच्या विचारप्रवर्तक परिणामावर त्याचा विश्वास नाहीं. कल्पनांचा किंवा सिद्धान्तांचा तर्कशुद्ध मनोरा बांधला म्हणजे लोकांना विचारप्रवण करण्याचें कार्य झालें, फार तर वक्तृत्वा-च्या ओघानें त्या विचारांना गतिमान् केलें म्हणजे झालें, अशी त्याची समजूत दिसते आणि म्हणूनच त्याचे क्रांतिकारक विचार—कागदी बाणांप्रमाणें—वाचक-प्रेक्षकांच्या मनांत खोल रुतून रुजूं शकत नाहींत. उदाहरणादाखल सार्टोरियसचीं दुसऱ्या अंकांतील दोन महत्त्वाचीं भाषणें[5] अभ्यासा-वींत व मग 'व्हे नि स चा व्या पा री ' या शेक्स्पियरच्या नाटकांतील शायलॉकचीं अंक १, प्रवेश ३ मधील दोन भाषणें[6] अभ्यासावींत. दोघेही आपण चालविलेल्या गरिबांच्या पिळवणुकीचें, स्वतःच्या मारवाडी वृत्तीचें, समर्थन करीत आहेत व या समर्थनाचा वाङ्मयीन उद्देश त्यांच्या ढोंगी बतावणीचे बुरखे फाडून त्यांच्या आसुरी द्रव्यलोभाचें उघडेंवाघडें स्वरूप दाखविण्याचा, सामाजिक अन्यायाबद्दल व वैयक्तिक हीनपणाबद्दल वाचक-प्रेक्षकांच्या मनांत विचारचक्रें सुरू करण्याचा आहे; लोकमताला धक्का देऊन लोकांना कटु सत्यांची जाणीव करून देण्याचा आहे. या दृष्टीनें दोघांच्या भाषणांची तुलना केली तर असें आढळेल कीं, सार्टोरियसचीं भाषणें एखाद्या वादविवादसभेंतील तात्त्विक चर्चे-सारखीं किंवा वकिली समर्थनासारखीं आहेत; त्यांत एक विशिष्ट प्रकारची व्यक्तिनिरपेक्ष अलिप्तता आहे. जणूं कांहीं सार्टोरियस एक बौद्धिक खेळ खेळत आहे व त्यांत तो जिंकला किंवा हरला तरी त्याला त्याचें फारसें सोयरसुतक नाहीं, असा भास होतो ! या उलट, शायलॉकच्या भाषणांत त्याच्या व्यक्तित्वाचा आविष्कार झालेला आढळतो. तो आपलें सर्वस्व पणाला लावून बोलत आहे, साक्षात् आसुरी द्रव्यलोभच बोलत आहे असा भास होतो. 'वि धु रां चीं घ रें ' च्या प्रस्तावनेंत शॉ म्हणतो कीं, कल्पितकथाकार या नात्यानें मी अगोदर पात्रें कल्पितों व मग त्यांच्याभोंवतीं कथेचे धागेदोरे विणतों.[7] कल्पिलेल्या पात्रांचा जिवंतपणा हें जर प्रभावी नाट्यलेखनाचें एक गमक असेल तर शाय-लॉकच्या जळजळीत, जिवंत व्यक्तिमत्त्वापुढें सार्टो-रियसचें कळसूत्री, लटकें, अलिप्त, अव्यक्त व्यक्तिमत्त्व निष्प्रभ वाटतें. हा फरक शायलॉक व सार्टोरियस या पात्रांच्या भिन्नतेमुळें ( शायलॉक हा कामक्रोधादिकांच्या लाटांवर पोहोणारा आदिमानव,

---

5 " My young friend, these poor people do not know..." व " Yes : a mortgage on my property..."

6 " How like a fawning publican he looks !..." व " Signior Antonio, many a time and oft..."

7 " As a fictionist, my natural way is to imagine characters and spin out a story about them."










तर सार्टोरियस हा तर्कशुद्ध विचारांचें प्रामाण्य मानणारा आधुनिक ) झालेला नसून शेक्स्पियर व शॉ यांच्या कलात्मक शब्दसाधनेच्या भिन्नतेमुळें झालेला आहे. शब्दांच्या तार्किक अर्थावर भर देऊन शॉ आपली शब्दरचना करीत असल्यामुळें त्याच्या लेखनांत बुद्धीला सुखस्पर्श वाटणाऱ्या भौमितिक रचना भरपूर सांपडतात. पण वाचकाच्या सर्व मानसशक्तींना जागृत करून त्याला दिव्य दृष्टि देण्याचें सामर्थ्य असलेली शब्दसृष्टि निर्माण करण्याचें ईश्वरत्व शेक्स्पियरजवळ आहे. वर उल्लेखिलेल्या दोन नाटकांतील आणखी एक साम्यस्थळ उद्बोधक होईल. रंजल्या-गांजल्यांना जवळ करून त्यांच्यावर मायेची, सहानुभूतीची पखरण करण्याच्या उद्देशानें शॉनें लिकूचीजच्या तोंडीं घातलेलें भाषण[8] व शेक्स्पियरनें पोर्शियाच्या तोंडीं घातलेलें भाषण[9] यांची तुलना केली असतां इष्ट परिणाम घडवून आणण्यांत शेक्स्पियरचा सरसपणा सहजच प्रत्ययाला येईल. ' धर्मका मूल ' असलेल्या दयेचा साक्षात्कार वाचकाला पोर्शियाच्या शब्दांतून जितक्या स्पष्टपणें होतो तितक्या स्पष्टपणें लिकूचीजच्या शब्दांतून होत नाहीं.

### अनुमानसंगति कीं स्वरसंगति ?

वर योजिलेल्या साक्षात्काराच्या कल्पनेच्या अनुषंगानें शॉच्या वाङ्मयव्याख्येंतील दोषाकडे, उणीवेकडे लक्ष देणें उचित ठरेल. शॉच्या कल्पनेप्रमाणें वाङ्मय म्हणजे लेखकाच्या मतांचा पुरस्कार, त्याला पटलेल्या सिद्धान्तांची परिणामकारक मांडणी, त्याच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाचें साधक-बाधक प्रमाणांच्या आधारें विवेचन. या व्याख्येच्या आधारानेंच तो शेक्स्पियरचीं नाटकें, डार्विनचा जीवनशास्त्रीय ग्रंथ व नीत्शाचा तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ या भिन्नप्रकृति लेखांना वाङ्मय असें संबोधतो व त्यांची तुलना करतो. पण वाङ्मयीन टीकाकार ज्या अर्थानें शेक्स्पियरचीं नाटकें वाङ्मयीन कलाकृति म्हणून अनुभवितो, त्या अर्थानें डार्विन किंवा नीत्शाचे ग्रंथ कलाकृति नाहींत हें उघड आहे. शॉ जेव्हां आपलें जीवनविषयक तत्त्वज्ञान पुढें मांडतो तेव्हां तें प्रमेयात्मक, सिद्धांतमय असतें. शेक्स्पियर जेव्हां आपलें जीवनविषयक तत्त्वज्ञान पुढें मांडतो तेव्हां तें विशिष्ट दृष्टिकोनांतून घडविलेला जीवनाचा साक्षात्कार या स्वरूपांत मांडतो. वाङ्मयीन कलावंताचें तत्त्वज्ञान जीवनानुभूतिस्वरूप असतें. मॅक्बेथ जेव्हां आपला जीवनविषयक विषाद, आपला नैराश्यवाद पुढें मांडतो तेव्हां वाचक-प्रेक्षकाला मूर्तिमंत विषादाचें दर्शन होतें व त्या मानसावस्थेची प्रत्यक्ष प्रतीति येते. " Tomorrow and tomorrow and tomorrow, Creeps in this petty pace from day to day ..." ( मॅक्बेथ, अंक ५, प्रवेश ५ ) हें भाषण वाचणारा वाचक त्यांतील शब्दांच्या जादूनें भारला जाऊन स्वतः मॅक्बेथ होतो व त्याच्या नैराश्यवादाची भीषण बधिरता स्वतः अनुभवितो. नैराश्यवादाचीं प्रमेयें व सिद्धान्त यांची पद्धतशीर माहिती त्याला मॅक्बेथच्या भाषणावरून मिळणार नाहीं, पण निराशेचा अनुभव त्याला मिळतो; साक्षात्कार होतो. ललितवाङ्मयाचें वैशिष्ट्य हेंच कीं, तें जीवनावर प्रज्ञावादात्मक भाष्य करीत नाहीं, तर वाचकाला जीवनाची मानसिक अनुभूति आणून देतें; विश्वरूपदर्शन घडवितें; शब्दांचे अर्थ, प्रतिमा, आंदोलनें व आवर्तनें यांच्या योगें वाचकमनाला लयबद्ध करून अनुभवक्षम बनवितें; जीवनसंगीताला संवादी करतें. जीवनाच्या विविध अंगांची संगति तर्क-प्रमेयांच्या अनुमानसंगतीप्रमाणें नसून संगीतांतील स्वरसंगतीप्रमाणें आहे आणि म्हणूनच जीवनाचें सम्यक् दर्शन घडविण्याचें सामर्थ्य ललित-वाङ्मयांत आहे.

### ब्रह्मवेत्ता डॉन जूअन आणि सौन्दर्योपासक लॉरेन्झो

शॉची वाङ्मयीन महत्त्वाकांक्षा मोठी होती. विश्वव्यापारांतील मानवी जीवनाचें स्थान

8 " Mark my words, gentlemen... " अंक २.

9 " The quality of mercy is not strained... " अंक ४, प्रवेश १








नियोजित करून तदनुरोधानें मानवी मूल्यें, नीतिकल्पना, समाजरचना, व्यक्तिविकास यांच्या पुनर्घटनेची दिशा दाखवावी अशा व्यापक बौद्धिक कार्यक्रम त्यानें स्वतःसाठीं आंखला होता. त्याच्या नाटकांतील प्रमुख नाटक ' मा न व आ णि अ ति मा न व(Man and Superman)' हें त्याच्या तत्त्वज्ञानाचा व्यापक व उठावदार पुरस्कार करण्यासाठीं रचलें गेलें. विश्वस्वरूपांत विलीन होण्यासाठीं मानवानें वैयक्तिक आकांक्षांचा व तात्कालिक सुखांचा त्याग करण्यास शिकलें पाहिजे, या त्यागांतच आपलें जीवनसाफल्य अनुभविण्यास शिकलें पाहिजे, ' आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां' या उक्तीचें मर्म जाणलें पाहिजे, इत्यादि सिद्धान्तांवर आधारलेल्या ब्रह्मज्ञानाचें विवेचन नाटकाचा नायक टॅनर—डॉन-जूआन् हा करतो. त्याचीं तिसऱ्या अंकांतील प्रदीर्घ भाषणें याच तात्त्विक सूत्रांत गोंविलीं आहेत.[१०] मनुष्याची बुद्धि हें एक विश्वजनक चिच्छक्ती-( Universal Life Force )नें स्वतःचें उद्दिष्ट साधण्यासाठीं निर्माण केलेलें प्रभावी हत्यार आहे, त्याचा खरा उपयोग मनुष्याच्या वैयक्तिक इच्छा-आकांक्षा पुऱ्या करणें हा नसून विश्वव्यापी चिच्छक्तीच्या इच्छा-आकांक्षा पुऱ्या करणें हा आहे. तत्त्वज्ञ हा निसर्गाचा कर्णधार आहे. या मध्यवर्ती कल्पनांचा विस्तार डॉन जूअन् करतो. या कल्पनांच्या मुळाशीं असलेला मानसिक अनुभव ब्रह्मजिज्ञासूला अत्यंत उपकारक व उद्‌बोधक असा आहे. फ्रॉइड ज्याला ' oceanic feeling ' ( विश्वस्वरूपांत आपलें स्वतंत्र व्यक्तित्व विलीन करण्याचा अनुभव) म्हणून संबोधतो, ज्याला भारतीय संस्कृति व्यक्तीचें जीवितसाफल्य समजते, ज्यायोगें जिज्ञासूला खरें विश्वरूपदर्शन होतें, त्या मौलिक मानसावस्थेचें वाङ्मयीन चित्रण करून त्या अवस्थेचा प्रत्यय वाचकाला आणून देण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून आपली सर्व वाङ्मयीन पुण्याई शॉनें या नाटकांत पणाला लावली आहे, असें म्हटलें तरी चालेल. या ब्रह्मावस्थेच्या मानानें व्हे नि स चा व्या पा री ( अंक ५, प्रवेश १ )—मधील लॉरेंझोची निसर्ग-सौंदर्यानें भारावलेली चिंतनावस्था किती तरी खालच्या व दैनंदिन पातळीची आहे. डॉन जूअन् ब्रह्मवेत्ता आहे, तर लॉरेंझो रमणीयतेचा उपासक, प्रेमवीर आहे. पहिला आपल्या तत्त्वज्ञानाचीं प्रमेयें पद्धतशीरपणें प्रस्थापित करण्यांत तरबेज आहे, वादकुशल आणि कुशाग्रबुद्धीचा आहे, तर दुसरा स्वप्नाळु, काव्यमय, भावनांच्या हिंदोळ्यावर डोलणारा आहे. पहिल्यानें विशद केलेलें ब्रह्मावस्थेचें तर्कशास्त्र वाचकाला सुलभतेनें उमगतें व पटतें; दुसऱ्याच्या चिंतनावस्थेचें तर्कशास्त्र अव्यक्त व अनाकलनीय आहे. चंद्रप्रकाश व विश्वसंगीत यांना जोडणारे तार्किक धागेदोरे गुंतागुंतीचे आहेत. पण सहृदय वाचकाला शॉच्या शब्दसृष्टींत प्रस्तुत ब्रह्मावस्थेचा साक्षात्कार होत नाहीं आणि शेक्स्पियरच्या शब्दसृष्टींत लॉरेंझोच्या चिंतनावस्थेचा साक्षात्कार होतो. शॉच्या शब्दयोजनेंत तर्कशुद्धता आहे, बुद्धिगम्य रचना आहे, वक्तृत्वाचा ओघ आहे, पण काव्यात्मक जादुगिरी नाहीं; वाचकमनाला तल्लीन व तद्रूप करून सोडण्याचें सामर्थ्य नाहीं. शेक्स्पियरजवळ शॉचें शास्त्रशुद्ध व विश्वव्यापी तत्त्वज्ञान नसेल, पण वाचकाला विशिष्ट मानसावस्थेचा प्रत्यय आणून देण्याचें कलासामर्थ्य आहे. ' वेडगळ ' इतालियन कवि दान्ते यांच्या स्वर्ग-नरकाच्या कल्पना रानटी असतील पण शब्दसाधनेच्या योगानें युगोलिनोच्या यातना व बिआत्रीचेनें कवीला मिळवून दिलेला परमेश्वरी स्वरूपाचा साक्षात्कार यांची उद्‌बोधक अनुभूति तो सहृदय वाचकाला देऊं शकतो.

## लोकजागृतीचें क्षेत्र आणि कलेचें क्षेत्र

वरील विवेचनाचा उद्देश शॉच्या वाङ्मयीन कामगिरीचें आजच्या जगांतील महत्त्व कमी लेखण्याचा नाहीं. आधुनिक इंग्रजी नाट्यवाङ्मयाच्या इतिहासांत शॉचें स्थान मानाचें आहे. ज्या वेळीं त्यानें नाट्यलेखनाला सुरुवात केली त्या वेळीं

---

१० उदाहरणादाखल " That is why intellect is so unpopular " व " ut I should not have them if they served no purpose " हीं दोन भाषणें वाचून पहावींत.










इंग्रजी रंगभूमीची स्थिति अनुकंपनीय झाली होती. नाट्यकलेला अवकळा आलेली होती. जीं नाटकें लिहिलीं अगर रचली जात होतीं तीं कृत्रिम, निर्जीव, नियमाबरहुकूम जुळविलेलीं (well-made plays) किंवा केवळ पुस्तकी, रंगभूमीवर आणण्यास अयोग्य अशीं (closet drama) होतीं. शॉचें महत्त्व हें कीं, त्यानें आपलें जिवंत विचार व जीवनविषयक तत्त्वज्ञान नाटकांच्या द्वारें व्यक्त केलें. कळसूत्री बाहुल्यांचा खेळ बनलेल्या नाटकांत त्यानें जीवन ओतलें. त्यानें संवादाचा चटकदारपणा आणि वादविवादांतील बौद्धिक चपलता हीं आयुधें वापरून मर्मभेदी शरसंधान केलें व सामाजिक रूढी, नीतिकल्पना, संस्था यांच्या घातक गृहछिद्रांविषयीं लोकांना विचार करावयाला लाविलें. शिष्टसंप्रदायाचें व रूढ श्रद्धांचें मूर्तिभंजन करून लोकजागृति केली. नाटक हें निरुपद्रवी करमणुकीचें साधन नसून प्रचाराचें प्रभावी शस्त्र आहे, असें दाखवून दिलें. लोकांना वाकुल्या दाखवून, हंसावयाला लावून, बौद्धिक आतषबाजीनें कुंठितमति करून आपल्याकडे आकर्षून घेतलें व आपली मतें व तत्त्वें त्यांच्या गळीं उतरविलीं. शॉची भूमिका चौपाटीवरील किंवा हाइडपार्कमधील मुरलेल्या, वादकुशल प्रचारक वक्त्याची आहे. ज्या कौशल्याच्या व पटुतेच्या जोरावर प्रभावी वक्ता यशस्वी होतो त्यांत कलेचा भाग आहे, पण ती कला व्यावहारिक (driving at practice) आहे. शेक्स्पियर, दांते इत्यादि कलावंतांची भूमिका स्वरालाप करणाऱ्या संगीतज्ञाची आहे. वादकुशल वक्ता श्रोत्यांच्या विचाराला चालना देऊन विशिष्ट मतें व सिद्धान्त त्यांना पटवून देण्याचा प्रयत्न करतो. वाङ्मयीन कलावंत संगीतज्ञाप्रमाणें नादब्रह्म किंवा शब्दसृष्टि निर्माण करून वाचकाला विशिष्ट अनुभूति मिळवून देतो; जीवनाचा साक्षात्कार घडवितो. कलेचें वैशिष्ट्य जर हें असेल तर कलावंत शॉचें स्थान शेक्स्पियर दांते इत्यादि कलावंतांच्या तुलनेनें खालच्या पातळीवरचें आहे, असें कबूल करावें लागेल. लोकजागृतीचें व लोकशिक्षणाचें काम शॉनें उत्कृष्ट प्रकारें केलें व त्याबद्दल कोणीहि त्याला धन्यवादच देईल. पण लोकशिक्षण–लोकजागृतीचें क्षेत्र वेगळें व कलेचें वेगळें, हें अवधान ठेवावयाला हवें.

---

## शॉचा उपरोध

व्हॉरॉनॉफ या डॉक्टरानें माकडाच्या ग्रंथी लावून माणसाला तरुण बनविण्याचा जो उपाय काढला आहे त्यावर डॉ. बॅच या डॉक्टरानें आक्षेप घेतला. त्याच्या मतें, यामुळें माकडाच्या अंगीं असलेलें क्रूरत्व, लैंगिक आसक्ति वगैरे दोष या ग्रंथींबरोबरच माणसाला जडतील. त्यावर, माकडाला क्रूर व लैंगिक आसक्तीचें म्हटल्याबद्दल माकडाच्या नांवावर शॉनें एक लेख लिहिला. तो माकड (म्हणजे शॉ) लिहितो : "हे मानवांनो, तुम्ही माकडांना क्रूर म्हणता काय ? कोणी तरी माकडानें जिवंत माणसांच्या ग्रंथी तोडून माकडाला त्याचें आयुष्य थोडें वाढविण्यासाठीं लावल्या आहेत काय ? धर्माच्या नांवानें माकडांनीं कधीं जुलूम केला आहे काय ? विषारी धूर माकडांनीं काढला कीं माणसांनीं ?—आणि आमच्या क्रौर्याची एवढी भीति तुम्हांला वाटते, पण व्हॅक्सिनेशन आणि अँटीटॉक्झिन यामुळें गाय आणि घोडा यांचे सद्गुण माणसाच्या अंगीं कोठें आले ? माणसावर कोणताहि संस्कार करा, तो क्रूरचा क्रूर आणि राक्षसासारखा कामासक्तच राहील. डॉ. व्हॉरॉनॉफनें आमच्या ग्रंथी लावून माणसाला कितीहि सन्माननीय माकड बनविण्याचा प्रयत्न केला तरी माणसाचें क्रौर्य नाहींसें होणार नाहीं !"

'लोकमान्य' (मुंबई), ३-११-५० च्या अग्रलेखांतून








डॉ. वि. ना. ढवळे

# बर्नार्ड शॉ यांचें तत्त्वज्ञान

एखाद्या ललितलेखकाच्या तत्त्वज्ञानाविषयीं चर्चा करावी किंवा नाहीं हा आधुनिक टीका-तंत्रांतील एक अत्यंत वादग्रस्त मुद्दा आहे. विशेषतः नाटककार म्हणून प्रसिद्ध असलेल्या व्यक्तींच्या मतांविषयीं अथवा तत्त्वज्ञानाविषयीं फारच जपून बोलावयास हवें. कारण नाटकांतील निरनिराळ्या पात्रांचीं पुष्कळशीं मतें नाटककारावर लादणें बरोबर नाहीं. पण शॉ यांच्या बाबतींत हा विचार येण्याचें कारण नाहीं. याचें एक कारण असें कीं, त्यांनीं केवळ नाटकें लिहिलीं नसून इतर कित्येक चर्चात्मक पुस्तकें कादंबऱ्या, निबंध, प्रस्तावना, वगैरे लिहिलीं आहेत. त्यांच्या प्रत्येक नाटकाला एक दीर्घ प्रस्तावना असून त्यांत नाटकांतील सर्व मुद्दे अत्यंत काळजीनें चर्चिलेले आढळून येतात; तेव्हां त्यांचे इतस्ततः विखुरलेले विचार एकत्र आणून त्यांचें तत्त्वज्ञान समजून घेणें अशक्य नाहीं. शिवाय त्यांचीं नाटकें केवळ प्रचाराकरितां लिहिलीं गेलीं, असें त्यांचें स्वतःचेंच सांगणें आहे. 'कले-करितां कला' हें तत्त्व त्यांना बिलकुल मान्य नसल्यानें त्यांचें प्रत्येक नाटक हें कोणतें तरी नवीन तत्त्व अगर विचार शिकविण्यासाठीं लिहिलें गेलें. नवीन सांगण्या-सारखें कांहीं नसेल तर एक शब्दहि बोलूं नये किंवा लिहूं नये असा त्यांचा बाणा होता. आणि हा बाणा असूनहि त्यांना असंख्य पुस्तकें लिहावीं लागलीं, व जन्मभर वादविवाद करावा लागला. यावरून त्यांच्याजवळ असलेल्या विचारांच्या भांडवलाची कल्पना येईल.

### शॉ यांच्या मतांना मिळालेली प्रसिद्धि

शॉ यांची 'विचारांच्या सामर्थ्या'-( power of ideas ) वर अतिशय दृढ श्रद्धा होती. एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील निर्भेळ बुद्धिवादी लोकांत त्यांना फार महत्त्वाचें स्थान आहे. बुद्धीला जें पटेल तें तर्कशास्त्राच्या साहाय्यानें व मुद्देसूद वक्तृत्वानें लोकांना पटवून देण्याचा त्यांनीं जन्मभर प्रयत्न केला. साहाजिकच त्यांचे निरनिराळ्या विषयां-वरील 'विचार' ( अथवा 'कल्पना' ) असंख्य होते. हे विचार एकत्र आणल्यास त्यांचें समाज-विषयक, राजकीय, शिक्षणविषयक वगैरे तत्त्वज्ञान कळून येईल. पण 'तत्त्वज्ञान' या शब्दाचा हा अर्थ फार सामान्य आहे, व अशा अर्थी तत्त्वज्ञान सर्वच लेखकांचें असतें. शेक्स्पिअर किंवा डॉ. जॉन्सन् यांसारख्या लेखकांविषयीं बोलतांना आपण तत्त्वज्ञान याचा अर्थ 'जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन' किंवा 'महत्त्वाच्या प्रश्नांवरील मतें' एवढाच करतों. शॉ यांचें अशा तऱ्हेचें तत्त्वज्ञान जरी पुष्कळ असलें तरी, त्याचा विचार या लेखांत येणार नाहीं. तें कमी प्रसिद्ध आहे असें नव्हे. उलट, त्यांचे समाजाला धक्के देणारे विचारच विक्षिप्तपणाचे वाटत असल्यानें ते जास्त प्रसिद्ध आहेत. त्यांचीं कांहीं मतें—विशेषतः स्त्री व पुरुष यांचे संबंध, व शिक्षण, युद्ध, कला, वैद्यकशास्त्र वगैरेबद्दल—जगभर गाजलीं, व त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. पण या तत्त्वज्ञाना-विषयीं दोनच गोष्टी सांगून त्यांच्या खऱ्या तत्त्व-ज्ञानाचा विचार केला पाहिजे. एक गोष्ट अशी कीं, त्यांचीं फुटकळ मतें आतां फार जुनीं, व कांहीं अंशीं निरुपद्रवी आणि अपुरीं वाटतात. त्यांना हव्या असलेल्या अनेक समाजसुधारणा घडून आल्या असल्यानें, नवीन पिढीला त्यांचें एका काळीं गाजलेलें

तत्त्वज्ञान फारसें पुरोगामी किंवा उपयुक्त वाटत नाहीं. दुसरी गोष्ट म्हणजे शॉ यांनीं त्यांच्या अनेक मतांना आपल्या विक्षिप्तपणानें प्रसिद्धि मिळवून दिली. जी गोष्ट सरळ सांगून पटणार नाहीं तीच विदूषकी थाटानें सांगितली तर कांहीं वेळां पटते. त्याची सामान्य विचार सांगण्याची पद्धति एका व्यंगचित्रकारानें बरोबर दाखवून दिली आहे. त्यानें शॉ हे खालीं डोकें वर पाय करून लंडनच्या रस्त्यांत उभे असलेले दाखविले आहेत. या व्यंग-चित्रावरून त्यांच्या प्रचार करण्याच्या पद्धतीची कल्पना येईल.

तत्त्वज्ञान हा शब्द दुसऱ्या एका अर्थींहि वापरतात. प्लेटो किंवा ॲरिस्टॉटल यांच्याविषयीं लिहितांना त्या शब्दाचा अर्थ केवळ ' निरनिराळ्या विषयांवरील मतें ' एवढाच नसून विश्वाच्या निर्मितीपासून सुरुवात करून व शक्य तितका विश्वाच्या भविष्यकाळाबद्दलहि विचार करून तयार केलेला एक तर्कशुद्ध व अतिविस्तृत असा जीवनाचा आराखडा, असा असतो. त्यांत मानवाचें जगांतील कार्य, एकंदर विश्वाशीं त्याचा आलेला अगर येऊं शकणारा संबंध, त्याची कर्तव्यें व जबाबदाऱ्या, वगैरे अनेक गोष्टींचा समावेश होतो. शॉ यांना या अर्थींहि तत्त्वज्ञान होतें व त्याचाच मुख्यतः विचार येथें करावयाचा. सर्व तत्त्व-ज्ञान बहुधा, शॉ यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें, ' विचार पोंचूं शकेल तेथपर्यंत ' म्हणजे मति कुंठित होई-पर्यंत (as far as thought can reach) प्रवास करून येतें. त्यामुळें सर्वसाधारण मनुष्याला अशा तऱ्हेचें तत्त्वज्ञान म्हणजे केवळ एक बुद्धीची कसरत किंवा तर्कशास्त्राचा दुरुपयोग वाटतो. व पुष्कळ वेळां तें खरेंहि असते !

## चिच्छक्तीचा सिद्धान्त

शॉ यांच्या तत्त्वज्ञानाचा उगम एकोणिसाव्या शतकांतील शास्त्रीय प्रगतींत आहे. त्या शतकाच्या उत्तरार्धांत सर्वच शास्त्रांची झपाट्यानें प्रगति झाली. विशेषतः डार्विन यांच्या ' उत्क्रांतिवाद ' (evolution) च्या सिद्धान्तामुळें जीवशास्त्राला फार महत्त्व आलें. जुन्या तत्त्वज्ञानांतून शास्त्रीय ज्ञानावर भर मुळींच नसल्यानें शॉ यांना त्याबद्दल आदर नव्हताच. नव्या युगाचें तत्त्वज्ञान शास्त्रीय ज्ञानावर आधारलेलें पाहिजे व त्यांत जुन्या कल्पना–उदा० ईश्वर, पाप, पुण्य, वगैरे–असतां कामा नयेत, या दृष्टीनें शॉ यांनीं एक मतप्रणाली जगापुढें मांडली व तीच त्यांचें खरें तत्त्वज्ञान. या मतप्रणालींतील मुख्य गोष्टी अशा : डार्विन वगैरे उत्क्रांतिवाद्यांच्या मूलभूत सिद्धान्ताप्रमाणें मानव हा अचानकपणें निर्माण झाला नसून तो निसर्गातल्या स्वाभाविक उत्क्रांतीचा परिणाम आहे. सर्व जगांत जीवनार्थ कलह सारखा चालूं असून नैसर्गिकरीत्या निवड होऊन अत्यंत लायक असेच प्राणी जिवंत राहतात. या सामान्य सिद्धान्तावरून शॉ यांनीं असा सिद्धान्त मांडला आहे कीं, ज्या अर्थीं अत्यंत सूक्ष्म अशा जीवापासून उत्क्रांति होत होत अनेक प्राणी निर्माण झाले व शेवटीं बुद्धिमान् मनुष्य जन्माला आला, त्या अर्थीं अशीच उत्क्रांति (विकास) होत गेल्यास एकदा अति-मानव-(Superman)हि खात्रीनें निर्माण होईल. व तो निर्माण करण्याचा प्रयत्न मानवानेंहि केला पाहिजे. ज्याप्रमाणें घोडे किंवा इतर जनावरें यांचे वंश मनुष्यानें सुधारून दाखविले त्याप्रमाणेंच मानवाचा वंशहि सुधारेल ! आपल्या मताच्या समर्थनार्थ त्यांनीं दुसऱ्या एका शास्त्रज्ञाचा आधार घेतला. तो शास्त्रज्ञ म्हणजे सुप्रसिद्ध लामार्क. या फ्रेंच जीवशास्त्रज्ञानें डार्विनच्याहि आधीं मांडलेल्या तत्त्वांप्रमाणें उत्क्रांति ही निर्हेतुक ' यदृच्छया ' नसून सहेतुक असते. प्रत्येक लहानमोठ्या जीवाची आहे त्यापेक्षां सर्व तऱ्हेनें विशाल व परिपूर्ण असें जीवन मिळण्याची धडपड चालूं असते. विशेषतः एखादी महत्त्वाची उणीव भासली कीं, ती भरून काढण्याचा जीव प्रयत्न करतो. म्हणून नवनवे अवयव निर्माण होतात, अगर जुन्यांत फरक होत जातो. उदाहरणार्थ, जिराफाची मान लांब होण्याचें कारण म्हणजे उंचावरील पानें खाण्याकरितां लांब मानेची त्याला भासलेली जरूरी ! एकदां असे नवीन अवयव किंवा नवीन संवयी निर्माण झाल्या म्हणजे त्या, आनुवंशिकतेच्या तत्त्वानुसार, पुढील पिढ्यांतहि राहतात. या सर्व मतांबद्दल शास्त्रज्ञ म्हणून बोलण्याचा शॉ यांना अधिकार नव्हता. व त्यांच्या तत्त्वज्ञानाचा विचार करतांना या बाबतींतील आधु-

निक मतेंहि लक्षांत घेऊन चालणार नाहीं. त्यांनीं उत्क्रांतिवादाचा किंवा सृजनशील उत्क्रांतिवादा-( Creative Evolution ) चा उपयोग आपली 'अतिमानवा'च्या उत्पत्तीची शक्यता सिद्ध करण्या-करितां केला. जितका मानव बुद्धीवर किंवा 'विचारा' वर भर देईल तितका त्याचा मेंदू अधिकाधिक कार्यक्षम होत जाईल; कदाचित् नव्या तऱ्हेचा मेंदूहि निर्माण होईल. मात्र हें सर्व होण्यास केवळ ' जीवना-साठीं धडपड ' पुरेशी नसून अत्यंत प्रबळ अशा इच्छाशक्ती-( निश्चयशक्ति=will ) ची जरूर आहे. थोडक्यांत म्हणजे ' निश्चयाचें बळ ' असेल तर कांहीं पिढ्यांनंतर तरी आजच्या मानवांत महत्त्वाचे फरक होतील व नवा मानव निर्माण होईल. मानव निर्माण झाल्याबरोबर उत्क्रांति थांबली, असें मानण्याचें कारण नाहीं.

शॉ यांना डार्विनवादापेक्षां लामार्कचें मत अधिक पसंत पडलें. याचें कारण त्या मतानुसार केवळ यांत्रिक (mechanical) उत्क्रांति नसून सर्व हेतुपुरःसर (purposive) घडतें. माकडाची परिणति मानवांत होण्यास कोणत्या तरी शक्तीचा ( उदा. निसर्ग किंवा ईश्वर ) व प्रत्येक जीवाचा पूर्णत्वाकडे जाण्याचा हेतु कारणीभूत आहे. निसर्ग किंवा ईश्वर याऐवजीं शॉ यांचा शब्दप्रयोग ' जीवशक्ति ' ( Life Force, चिच्छक्ति ) असा आहे. जीवशक्ति नवे नवे जीव निर्माण करीत आहे व नवीन जीवानें मागच्या सर्व जीवांना बुद्धींत मागें टाकावें अशी त्या शक्तीची इच्छा आहे. शॉ यांच्या लेखनांत जीव-शक्ति हा शब्द वरचेवर येतो व तो ते 'आदितत्त्व, आदिकारण' अशा अर्थीं वापरतात, असें एकंदरीत वाटतें. कांहीं तत्त्ववेत्ते ईश्वराचें अस्तित्व मान्य करून आपल्या तत्त्वज्ञानाला एक भक्कम बैठक तयार करतात. पण शॉ यांना ईश्वराचा उल्लेख टाळावयाचा असल्यानें त्याचें सर्व महत्त्वाचें कार्य त्यांनीं Life Force वर सोंपविलेलें आहे. जीवशक्ति ही अर्थात् सर्वांत मोठी प्रेरक शक्ति होय. या शक्ती-मुळेंच सर्व विकास चालला आहे व चालू राहील. सर्वसामान्य मनुष्य ज्याप्रमाणें प्रत्येक बरीवाईट गोष्ट देवाच्या ( किंवा दैवाच्या ) नांवावर लादण्याचा प्रयत्न करतो त्याप्रमाणेंच शॉ यांनीं लहान-मोठ्या कित्येक गोष्टी जीवशक्तीच्या आधारें उकलून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांना प्रत्येक घडामोडींत या शक्तीचा आविष्कार दिसतो. Back to Methuselah हें नाटक जीवशक्तीचा शॉ-यांच्यामार्फत झालेला आविष्कार होय, हें मत त्यांनीं कित्येक वेळा मांडलें ! याचप्रमाणें जगांतील सर्व थोर पुरुष व स्त्रिया, इतकेंच काय पण शॉ यांच्या नाटकांतील महत्त्वाचीं पात्रें सुद्धां, याच शक्तीचे निरनिराळे आविष्कार आहेत. त्यांची सीझर, नेपोलिअन्, हिट्लर किंवा जोन ऑफ आर्क व क्लिओपाट्रा यांच्याकडे पाहण्याची दृष्टि या मूलभूत सिद्धांन्तांवर अवलंबून आहे.

## निदान तीनशें वर्षें जगलें पाहिजे

हें सर्व खरें आहे असें मनल्यास अतिमानव ( Superman ) निर्माण झालाच पाहिजे. जीव-शक्तीचे अव्याहत प्रयोग चालू असल्यावर केव्हां-तरी तो निर्माण होईल. पण या निर्मितींत मानवाचा संबंध नसेल तर या तत्त्वज्ञानाचा त्याला कांहीं उप-योग नाहीं. म्हणून शॉ यांचें सांगणें असें कीं जीव-शक्ति व मानव या दोघांच्या इच्छे-( Will ) नें नवीन मानव निर्माण होईल. त्याकरितां दोघांचेहि सहकार्य हवें. ज्याची तीव्रतेनें इच्छा करावी तें घडतें किंवा मिळतें हा सिद्धान्त या तत्त्वज्ञानांत फार महत्त्वाचा आहे. जीवांत बदल होतो तो त्याला बदल हवा असतो म्हणून, व्हावासा वाटतो म्हणून; आपोआप नव्हे. हें तत्त्व मांडतांना शॉ यांनीं एके ठिकाणीं लामार्कप्रमाणेंच असें म्हटलें आहे कीं, ' एखाद्या आंधळ्याला जर पाहण्याची तीव्र इच्छा असेल व तो पाहण्याचा सतत प्रयत्न करीत राहील, तर त्याला दृष्टि प्राप्त होईल.' आपणांस काय हवें याची एकदां बरोबर कल्पना आली कीं, आपण त्याची प्राप्ति करून घेण्याकरितां आपल्या इच्छा-शक्तीची ( निश्चयशक्तीची ) योजना करावी.

"...Imagination is the beginning of creation. You imagine what you desire; you will what you imagine; and at last you create what you will."








" To desire, to imagine, to will, to create."

अतिमानवाची कल्पना Man and Superman या नाटकांत शॉ यांनीं मांडली. त्याच कल्पनेचा विस्तार त्यांच्या Back to Methuselah या नाटकांत केलेला आहे. त्यांचें तत्त्वज्ञान नीट कळण्यास या नाटकाचा फार उपयोग आहे. पुढें काय होईल व काय व्हावें याचा तपशीलवार अंदाज शॉ यांनीं या नाटकांत केला आहे. कल्पनाशक्तीच्या आधारें मानवाचा संपूर्ण इतिहास लिहिण्याचा हा प्रयत्न आहे व त्यांत मानवी आयुष्यांतील निरनिराळीं स्थित्यंतरें दाखवलीं आहेत. विशेष तपशील लक्षांत न घेतां त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें महत्त्वाचे असे कांहीं मुद्दे येथें सांगितले पाहिजेत. एक म्हणजे शॉ यांच्या मतें मानवाचें आयुष्यमान पुढें वाढत जाईल. या सिद्धान्ताच्या समर्थनार्थ ते स्वतःचेंच उदाहरण देतात. दीर्घायुष्याचें महत्त्व त्यांच्या या तत्त्वज्ञानांत फार आहे. कारण सामान्य मनुष्याचें आयुष्य कोणतीहि महत्त्वाची गोष्ट करण्यास फार अपुरें आहे, असें त्यांचें मत होतें. तेव्हां मनुष्यानें निदान तीनशें वर्षें जगायचें ठरविलें पाहिजे. तीन हजार ठरविल्यास तेंहि त्याला शक्य होईल. उत्कृष्ट राज्यकारभार करण्याला निदान तीनशें वर्षें जगणारे तरी मुत्सद्दी हवेत. म्हणजे त्यांना शंभर वर्षें अभ्यासांत घालवितां येतील, शंभर वर्षें प्रत्यक्ष राजकारणांत, व शंभर इतरांना शिकवून तयार करण्यांत. अशा तऱ्हेचीं शेंकडों वर्षें जगणारीं माणसें त्यांच्या नाटकांत त्यांनीं पात्रें म्हणून वापरलीं आहेत. त्यांच्या 'अतिमानवा'ची जागा Back to Methuselah मध्यें अशा प्रवृद्ध लोकां ( Ancients ) नीं घेतलेली दिसते. नुसतें वय वाढवून व विचारशक्ति ( मेंदू ) वाढवून करावयाचें काय, हा प्रश्न शिल्लक राहतोच. शॉ यांच्या मतें हे वृद्ध स्त्री-पुरुष विचारांत किंवा एका प्रकारच्या चिंतनांत वेळ घालवितील. हा विचार कसला हें निश्चित नाहीं. कारण एकदां पूर्णावस्थेला पोंचल्यावर काळजी कसली करावयाची व विचार कसला, करावयाचा? या प्रश्नावर शॉ यांचें निश्चित मत नसल्यानें त्यांच्या या कल्पनेवर टीकाकारांनीं कडक टीका केलेली आहे. कारण एकदां विकास होण्याची शेवटची पायरी पोंचली अशी कल्पना केली, कीं आपली मति कुंठित होते व अशा शेवटच्या पायरीला गेलेल्या भाग्यवान् लोकांनीं कसें वागावें व काय करावें, हें आपण सांगूं शकत नाहीं. तें कसेंहि असो. शॉ यांचे हे वृद्ध स्त्रीपुरुष म्हणजे 'शुद्ध' विचाराचा आविष्कार, किंवा साकारमूर्ति. अर्थात् त्यांना चिंतनांतच वेळ घालवावा लागेल.

### जुनेंच मत; नवीन मांडणी

दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे जीवना-( life ) च्या उत्पत्तीबद्दलचें शॉ यांचें मत. बायबल वगैरे धर्मग्रंथांतून आलेली जगाच्या उत्पत्तीबद्दलची माहिती अर्थात् अशास्त्रीय आहे. तेव्हां शॉ यांनीं थोडासा आधुनिक शास्त्रज्ञांचा आधार घेऊन आपली उपपत्ति मांडली. त्यांच्या उपपत्तींत अद्वैतवाद नाहीं. प्रथम विश्वांत दोन घटक होते : एक जीव-तत्त्व ( life ) व दुसरा जडतत्त्व ( matter ). या दोहोंत एक प्रकारचा झगडा नेहमीं चालूं असतो. जडतत्त्व हें जीवना-( life ) चा शत्रु, असें ते मानतात. जीवनामुळें जडतत्त्वांत चैतन्य येतें व या चैतन्यांतून जीव निर्माण होतात. जीव म्हणजे जीवनाचा जडतत्त्वांत झालेला आविष्कार किंवा प्रत्यक्षदर्शन. पण उत्क्रांति होत होत हळूंहळूं जडतत्त्वाचें महत्त्व कमी होत जाईल व हें कमी करण्याकडे जीवाचा प्रयत्न असला पाहिजे. शेवटीं एक वेळ अशी येईल कीं, जीवतत्त्वाचा विजय होईल व जडतत्त्वाची जरूरी राहणार नाहीं. हाच सिद्धान्त जरा वेगळ्या तऱ्हेनेंहि ते सांगतात. विश्वांत जडशक्ति ( Pure Force ) व चिंतनशक्ति ( Pure Thought ) या दोन शक्तींचा झगडा चालूं आहे. हळूंहळूं चिंतनशक्तीचा जय होत आहे. शेवटीं अशी स्थिति येईल कीं फक्त चिंतनशक्तीच राहील. म्हणजे 'जडशक्तीचा भोंवरा' ( whirl-pool in pure force ) जाऊन त्याचें स्थान 'शुद्ध चिंतनाचा किंवा बुद्धीचा भोंवरा' ( whirl-pool in pure intelligence ) घेईल. पण हें सर्व घडवून कोण आणणारी अर्थात् जीवशक्ति. त्यांच्या नाटकांत जीवशक्ति हेंच एक पात्र असल्यानें उत्क्रांतिवादांतील सर्व गोष्टी त्या पात्राच्या मुखांतून त्यांनीं सांगितल्या आहेत.








(पहा : Lilith in 'Back to Methuselah'). पण जीवशक्तीच कोठून आली हें सांगणें शक्य नाहीं. ही शक्ति म्हणजे एक आदिकारण, असें मान्य केल्याशिवाय त्यांच्या तत्त्वज्ञानाची उभारणी नीट होत नाहीं. वर दिलेल्या स्थूल आराखड्यावरून शॉ यांना खरोखर एक जुनेंच मत जरा नव्या तऱ्हेनें मांडावयाचें होतें, हें दिसतें. Body and Soul, Matter and Spirit असल्या जोड्या तत्त्वज्ञानाला नवीन नाहींत. तेव्हां शॉ यांनीं जुने शब्द टाळून नवीन अधिक संदिग्ध अर्थाचे शब्द वापरल्यानें त्यांच्या तत्त्वज्ञानाला शेवटीं ( इतर अनेक तत्त्वज्ञानांप्रमाणें ) गूढगुंजनाचें किंवा निरर्थक शब्दावडंबराचें स्वरूप येतें. हा दोष शॉ यांच्यासारख्या काव्यद्वेष्ट्या तत्त्वज्ञाच्या लेखनांतहि आला हें पाहिलें म्हणजे मानवी मनाची गंमत वाटते. भारतीय तत्त्वज्ञानाची माहिती असलेल्या वाचकांना शॉ यांचें तत्त्वज्ञान क्लिष्ट वाटणार नाहीं. कारण शब्द बदलले तरी कल्पनासादृश्य राहतेंच.

## निष्क्रियतेला स्थान नाहीं

कोणत्याहि तत्त्वज्ञानाविरुद्ध अनेक आक्षेप घेतां येतात. कारण ज्या गोष्टी सिद्ध करणें केवळ तर्कशास्त्रावर अवलंबून ठेवावें लागतें, त्यांवर सर्वांचा सारखा विश्वास बसणें शक्य नाहीं. अगदीं आधुनिक तर्कशास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ ( उदाहरणार्थ, बर्ट्रांड रसेल यांच्यासारखे ) शॉ यांच्या विचारावर अनेक आक्षेप घेऊं शकतील. सामान्य माणसालाहि कित्येक प्रश्न सुचतात. उदाहरणार्थ : शेवटीं जर एक तत्त्व कांहींहि खुलासा न करतां मान्य करावेंच लागतें, तर त्याला जीवशक्ति म्हटलें किंवा ईश्वर म्हटलें तरी फरक काय ? त्याचप्रमाणें ईश्वराचीं कांहीं वर्णनें जीवशक्तीला लागू पडत नाहींत. पण एवढ्यावरून या शक्तीचें अस्तित्व अगर वैशिष्ट्य शास्त्रीय रीत्या सिद्ध झालें असें नव्हे. पण तार्किक चर्चा न करतां शॉ यांच्या तत्त्वज्ञानाचा व्यावहारिक परिणाम काय, हें पाहूं. तें तत्त्वज्ञान रोजच्या आयुष्यक्रमावर परिणाम घडवूं शकेल, असें आहे. त्याचा मुख्य गुण म्हणजे तें आशावादी आहे. मानवाची सुधारणा, विकास होत आहे, व होणें शक्यच काय पण अटळ आहे हें त्यांचें सूत्र फार स्फूर्तिदायक आहे. त्याचप्रमाणें मानवाच्या इच्छाशक्तीला त्यांच्या तत्त्वज्ञानांत फार महत्त्व आहे, हें लक्षांत घेतलें पाहिजे. मानवाला आनंद व उत्साह वाटावा अशीच उपपत्ति शॉ यांनीं आपल्या स्वभावानुसार मांडली, हें उघड आहे. सामान्य मनुष्यास आपल्या मुद्दाम केलेल्या ( conscious ) मदतीनें सृष्टीचा विकास होत आहे, हें वाचून फार हुरूप वाटेल. नियतिवादामुळें किंवा कोणत्याहि निराशावादी तत्त्वज्ञानानें निष्क्रियतेला उत्तेजन मिळूं शकतें. शॉ यांच्या तत्त्वज्ञानांत निष्क्रियतेला स्थान नाहीं. 'उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ' हा एका अर्थी मानवाचा व जीवशक्तीचा दोघांचाहि मंत्र आहे असें दिसतें. कांहीं व्यावसायिक तत्त्वज्ञ आणि हार्डीसारखे ललितलेखक यांच्या मतांशीं तुलना करतां शॉ यांचें तत्त्वज्ञान पुष्कळच स्फूर्तिदायक व ' पुरोगामी ' वाटतें.—पण या तत्त्वज्ञानाचा दुरुपयोगहि कसा होऊं शकेल हें थोडक्यांत दाखवून हा लेख पुरा करतों. ' अतिमानव ' निर्माण होणार हें निश्चित ठरल्यावर एखाद्यानें स्वयंस्फूर्तीनें आपणास अतिमानव मानून निरनिराळे चाळे सुरू केले तर काय करणार ? हिट्लर, मुसोलिनी व त्यांच्यासारखे इतर सुलतान स्वतःला अतिमानवच मानतात. जर्मन तत्त्वज्ञांनी—विशेषतः नीत्श यानें—अतिमानवाची कल्पना आपल्या तत्त्वज्ञानांत मांडली. त्याचे परिणाम —अथवा दुष्परिणाम—जर्मन राजकारणावर किती झाले व अजून होत आहेत हें सुप्रसिद्ध आहे. तसेच परिणाम शॉ यांच्याहि तत्त्वज्ञानाचे होणार हें, त्यांनीं सुलतानशाहीचें जें समर्थन आपल्या राजकारणविषयक नाटकांत केलें, त्यावरून दिसून येतें. याच तत्त्वज्ञानाचा दुसरा एक परिणाम म्हणजे शॉ यांना लोकशाही ( Democracy ) पसंत नाहीं ! कारण अतिमानव नेहमींच थोडे व मानव ( जे सामान्यतः मूर्ख असतात ) फार, तेव्हां लोकशाही मुळांतच चूक आहे. म्हणून शॉ यांनीं पार्लमेंटला शिव्या दिल्या व शहाण्या माणसानें पार्लमेंटांत जाऊं नये असा प्रचार केला ! शॉ यांच्या तत्त्वज्ञानाचा अनिष्ट असाहि उपयोग होऊं शकेल, हें सिद्ध करण्यास एवढें उदाहरण पुरेसें आहे.







प्रा. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# बर्ट्रँड रसेलचें तत्त्वज्ञान

नुकतेंच ज्यांना १९५० सालचें साहित्याचें नोबेल पारितोषिक मिळाल्याचें जाहीर झालें आहे, त्या बर्ट्रँड रसेलविषयीं सुप्रसिद्ध पदार्थशास्त्रज्ञ आइन्स्टाइन यांनीं एकदां उद्गार काढले होते कीं, " बर्ट्रँड रसेलच्या शास्त्रीय लिखाणानें मला जितकें मोहून टाकलें आहे, तितकें दुसऱ्या कोणत्याहि समकालीन शास्त्रज्ञाच्या लिखाणानें मला मोहविलें नाहीं." तत्त्वज्ञ व शास्त्रज्ञ या दृष्टीनें रसेलची योग्यता सिद्ध करावयाला हे उद्गार पुरेसे आहेत. गणित, पदार्थविज्ञान, तर्कशास्त्र, शिक्षणशास्त्र समाजशास्त्र, इत्यादि अनेक विषयांवर रसेलनीं मूलगामी व मूल्यशाली विचार मांडले आहेत. त्यांच्या विवेचनांत बौद्धिक प्रामाणिकपणा, सूक्ष्म तार्किकता, सुबोध व विनोदी भाषाशैली यांचा प्रत्यय पदोपदीं येतो. माझें मन रसेलच्या लिखाणाकडे प्रथम आकृष्ट झालें तें त्यांच्या ' तत्त्वज्ञानांतील कांहीं प्रश्न' ( Problems of Philosophy ) या छोट्याशा पुस्तकामुळें. मला लहानपणापासून तत्त्वज्ञानाची आवड होती. या क्षेत्रांत भारतीय तत्त्ववेत्त्यांनीं वाखाणण्यासारखी कामगिरी केली असल्यामुळें साहजिकच मी भारतीय तत्त्वज्ञानाकडे वळलों. लो. टिळकांच्या गीतारहस्यानें मला कांहीं काळ वेड लावलें होतें व त्यामुळें आद्य शंकराचार्य व वेदान्ततत्त्वज्ञान यांबद्दल मला बराच आदर वाटत असे. पुढें जेव्हां मी आचार्यांचीं तिन्हीं भाष्यें मुळांतन वाचलीं तेव्हां माझी या बाबतींत बरीच निराशा झाली. शब्दप्रमाणाचें मण्डन करण्यासाठीं आचार्यांनीं बऱ्याच अप्रामाणिक लटपटी केल्या आहेत. त्यांच्या सर्व लिखाणांत ज्याला आधुनिक दृष्टीनें तत्त्वज्ञान म्हणतां येईल असा फारच थोडा भाग आहे. उपनिषदांचा व ब्रह्मसूत्रांचा काय अर्थ करावयाचा हाच प्रश्न त्यांच्यासमोर प्रामुख्यानें आहे. उपनिषदें जें सांगतात त्यांच्या सत्यतेबद्दल प्रमाण काय ? हा प्रश्नहि त्यांच्या मनांत येत नाहीं. कारण उपनिषदांत जें म्हटलें आहे तें खोटें असूंच शकत नाहीं, अशी त्यांची नितान्त श्रद्धा आहे. जे ग्रंथ हजारों वर्षांपूर्वीं लिहिले गेले, जे कोणीं लिहिले हें कोणालाच माहीत नाहीं, जे लिहिणाऱ्यांनीं आपल्या सिद्धान्तांबद्दल कांहींच प्रात्यक्षिक वा तार्किक प्रमाणें दिलीं नाहींत, त्या ग्रंथांतील वचनें प्रमाण मानून, प्रत्यक्ष व अनुमान गुंडाळून ठेवा, आपल्या बुद्धीचा उपयोग करूं नका, असें सांगणाऱ्या ग्रन्थकारास प्रमाण म्हणून मानण्यास माझें मन तयार होईना. यामुळें आचार्यांकडून तत्त्वज्ञानांत मला कांहीं मार्गदर्शन मिळेल ही आशा मीं सोडून दिली.

आचार्यांबद्दल जरी माझी याप्रमाणें निराशा झाली तरी, वेदान्ततत्त्वज्ञानांत बरेंच तथ्य आहे, असें मात्र माझें मत कायम होतें. कारण वेदान्त-तत्त्वज्ञानाला पोषक असे अनेक युक्तिवाद नागार्जुन, श्रीहर्ष इत्यादि तर्ककुशल ग्रन्थकारांच्या ग्रन्थांत सांपडतात. शिवाय या तत्त्वज्ञानाला पोषक अशीं प्रमाणें ब्रॅडले, हेगेल इत्यादि पाश्चात्य ग्रन्थकार देखील देतात. अद्वैतवेदान्त व ब्रॅडले, हेगेल इत्यादि तत्त्वज्ञांचें तत्त्वज्ञान यांत महत्त्वाचें साम्य आहे व तें म्हणजे दोघांचाहि एकसत्यवाद. सर्व विश्वाच्या मुळाशीं एकच सत्य आहे, असें अद्वैतवेदान्त व वरील पाश्चात्य तत्त्वज्ञ प्रतिपादतात. एवढें साम्य सोडलें तर अद्वैत-वेदान्ताच्या व वरील पाश्चात्य तत्त्वज्ञांच्या एकसत्यवादांत बरीच तफावत आहे.

### एकसत्यवाद

वरील तत्त्वज्ञांच्या ज्या एकसत्यवादानें माझ्या मनावर छाप पाडली होती त्याची रूपरेषा अशी : 'सूर्य सकाळीं उगवतो', 'अग्नि उष्ण असतो' वगैरेपैकीं कोणतेंहि एखादें सत्य वाक्य घ्या. या वाक्यांचें सत्य स्वयंसिद्ध व स्वतंत्र नाहीं. दुसऱ्या अनेक सत्यांवर तें अवलंबून आहे. 'सूर्य सकाळीं उगवतो' हें वाक्य सत्य आहे, कारण 'सूर्य अस्तित्वांत आहे' हें सत्य आहे, 'सकाळ नांवाचा दिवसाचा एक प्रहर असतो' हें सत्य आहे, 'उगवणें या क्रियेला कर्ता असतो' हें सत्य आहे. बरें, 'सूर्य अस्तित्वांत आहे' या वाक्याचें सत्यत्व तरी स्वतंत्र व दुसऱ्या कशावर अवलंबून नसलेलें आहे, असें म्हणतां येईल काय ? नाहीं. 'सूर्य अस्तित्वांत आहे' हें सत्य आहे, कारण 'पृथ्वी अस्तित्वांत आहे', 'चंद्र अस्तित्वांत आहे', 'आकाश अस्तित्वांत आहे' हीं वाक्यें सत्य आहेत. पृथ्वी व चंद्र अस्तित्वांत नसतीं तर सूर्यावरील गुरुत्वाकर्षणाची ओढ कमी होऊन त्याची गति बदलली असती. आकाश अस्तित्वांत नसतें तर त्याच्या अविश्रान्त गतीला अवसरच मिळाला नसता. इतर ग्रहांचें अस्तित्व नसतें तर सूर्याचे गुणधर्म इतके बदलले असते कीं, त्याचें सूर्यत्वच नाहींसें झालें असतें. बरें 'पृथ्वी अस्तित्वांत आहे' या वाक्याचें सत्य तरी स्वतन्त्र व दुसऱ्या कशावर अवलम्बून नसलेलें आहे काय ? नाहीं. पृथ्वीची सूर्याभोंवतीची गति, तिची स्वतःभोंवतीची गति, तिचा आकार वगैरे सर्व गुणधर्म तिच्या दुसऱ्या ग्रहांशीं असलेल्या संबंधांवर अवलम्बून आहेत. अर्थात् हे दुसरे ग्रह अस्तित्वांत नसते तर, पृथ्वीचे गुणधर्म पालटले असते; पृथ्वीचें पृथ्वीत्व नाहींसें झालें असतें !

वरील विवेचनावरून हें लक्षांत येईल कीं, कोणत्याहि वाक्याचें सत्यत्व त्या वाक्याच्या इतर वाक्यांशीं असलेल्या संबंधांवर व त्यांच्या सत्यत्वावर अवलंबून आहे. कोणत्याहि एका यःकश्चित् सत्याशीं यच्चयावत् विश्वांतील सत्यें अनुस्यूत आहेत. म्हणून जेव्हां आपण कोणतेंहि 'सत्य' विधान करीत असतों तेव्हां आपण अखिल विश्वाबद्दल विधान करीत असतों. सर्व लहानलहान सत्यें हीं एका महान् सर्वव्यापी सत्याचेच घटकावयव आहेत. अर्थात् कोणतेंहि वाक्य सत्य आहे, हें ठरवितांना तें इतर अनेक सत्यांमध्यें बसूं शकतें कीं नाहीं, त्यांच्याशीं सुसम्बद्ध आहे कीं नाहीं, हें ठरविलें पाहिजे. सत्य म्हणजे सुसंवाद, सुसम्बद्धता. एकसत्यवाद्यांचा हा सिद्धान्त आहे. याळाच इंग्रजींत Coherence Theory of Truth असें म्हणतात.

या एकसत्यवादानें बरेच दिवस माझ्या मनाची पकड घेतली होती. एकसत्यवाद्यांची तर्ककुशलता व सूक्ष्मता फारच वाखाणण्यासारखी आहे. या वादाच्या अद्वैतवादाशीं असणाऱ्या मूलभूत साम्यामुळें माझें अद्वैतवादाबद्दल देखील अनुकूल मत होतें. हें मत हळूंहळूं बदलण्यास रसेलचें लिखाण कारणीभूत झालें. त्यांच्या 'तत्त्वज्ञानांतील कांहीं प्रश्न' ( Problems of Philosophy ) या लहानशा पुस्तकांत Idealism या सदराखालीं या वादाचा परामर्श घेतला आहे. हा भाग जेव्हां मी प्रथम वाचला तेव्हां एकसत्यवादाचें त्यांत केलेलें खंडन मला पल्लवग्राही व वरवरचें वाटलें. या खंडनाचें खण्डन करण्यासाठीं मी एक लेख लिहावयाला बसलों. या लेखाच्या निमित्तानें रसेलच्या युक्तिवादांचा मी जसजसा जास्त विचार करायला लागलों, तसतसा मला त्यांचा जोरकसपणा भासायला लागला व एकसत्यवादाबद्दल मी बराच संशयित झालों. पुढें रसेलच्या लिखाणाबद्दलची माझी गोडी वाढत गेली व त्यांचीं अनेक पुस्तकें मीं वाचलीं. या वाचनाचा माझ्या मनांवर बराच परिणाम होऊन मी एकसत्यवादापासून सारखा दूर जात गेलों.

### एकसत्यवादावर रसेलचे आक्षेप

एकसत्यवादाविरुद्ध रसेलचे युक्तिवाद असे मांडतां येतील : कोणत्याहि एका वाक्याचें सत्य विश्वांतील यच्चयावत् सत्य वाक्यांशीं अनुस्यूत आहे, हें एकसत्यवाद्यांचें विधान खरें नाहीं. उदाहरणार्थ, 'पानिपतची लढाई १७६१ सालीं झाली' हें वाक्य घ्या. या वाक्याचें सत्य 'इंग्लण्डच्या राजानें प्रेमाखातर राज्यत्याग केला' या वाक्यावर अवलम्बून आहे काय ? एखाद्या व्यक्तीला अपरिमित बुद्धि आहे अशी आपण कल्पना केली व तिला यापैकीं एकच वाक्य










सांगितलें तरी त्या एका वाक्यावरून दुसऱ्या वाक्याचें सत्यत्व त्या व्यक्तीला अन्दाजतां येईल काय? नाहीं. अन्दाजतां येईल असें म्हणणाऱ्यांना, इंग्लण्डच्या राजानें प्रेमाखातर राज्यत्याग केला नसता, तर १७६१ सालीं पानिपतची लढाई झाली नसती, असें मानावें लागेल! दोन्ही वाक्यें सत्य असलीं तरी, एकाचें सत्य दुसऱ्याच्या सत्यावरून नेहमीं अनुमानतां येईलच असें नाहीं. अनेक सत्यें याप्रमाणें परस्पर-निरपेक्ष व स्वतंत्र असूं शकतात. यावरून सर्व सत्यें एकमेकांशीं अनुस्यूत आहेत व तीं एका महान् व सर्वव्यापी सत्याचे घटकावयव आहेत, हा एकसत्य-वादाचा सिद्धान्त खोटा पडतो. 'मला कोणतेंहि एक सत्य द्या. मी त्याच्या आधारें जगांतील यच्चयावत् सत्य वाक्यांची सत्यता सिद्ध करून दाखवतों' असें हेगेल म्हणत असे. यावर 'तुझ्या तत्त्वज्ञानांतलें ब्रह्म (absolute) खरें आहे या सत्यावरून माझ्या टांकाचा रंग कोणता हें सिद्ध करून दाखव' असें त्याच्या मित्रानें त्याला आह्वान दिलें. हेगेलला हें आह्वान स्वीकारतां येईना, तेव्हां 'तुझ्या टांकाचा रंग कोणता याची उठाठेव करण्यापेक्षां जास्त महत्त्वाचीं अशीं माझ्या तत्त्वज्ञानाला अनेक कामें आहेत' असें चिड-खोर उत्तर देऊन हेगेलनें वेळ मारून नेली. हेगेलच्या मित्राचें आह्वान हें त्याच्या व तत्सदृश इतर तत्त्वज्ञांच्या तत्त्वज्ञानाचें बिनतोड खण्डन आहे.

वाक्यांचें सत्यत्व याप्रमाणें स्वतंत्र व परस्परनिर-पेक्ष राहूं शकत असल्यामुळें सुसम्बद्धता ही सत्याची कसोटी होऊं शकत नाहीं. 'अमुक वाक्य सत्य आहे. कां? तर तें इतर सत्य वाक्यांशीं सुसम्बद्ध आहे म्हणून' असें म्हणतां येणार नाहीं. एखाद्या वाक्याचा इतर कोणत्याहि सत्य वाक्यांशीं सम्बध नसतांना देखील तें सत्य राहूं शकेल. याच्या उलट, एखादें वाक्य इतर अनेक वाक्यांशीं सुसम्बद्ध असलें तरी, तें वाक्य व तें ज्यांच्याशीं सुसम्बद्ध आहे तीं इतर सर्व वाक्यें असत्य राहूं शकतात. एखाद्या कल्पित कथेंतील सर्व वाक्यें एकमेकांशीं सुसम्बद्ध असतात. पण ती सर्वच कथा व त्यांतील सर्व वाक्यें असत्य असतात. सुसम्बद्धता ही जर सत्याची कसोटी मानली तर कल्पित कथांना देखील सत्यकथा मानावें लागेल!

## सत्याची कसोटी

आतां यावर असा प्रश्न उपस्थित होतो कीं, सुसम्बद्धता ही जर सत्याची कसोटी नव्हे तर, सत्याची कसोटी आहे तरी कोणती? या प्रश्नाला रसेलचें उत्तर असें कीं, कोणत्याहि वाक्याचें सत्यत्व त्या वाक्याच्या स्वरूपाची कितीहि छाननी केली तरी कळून येणार नाहीं. 'टेबलाला चार पाय असतात' हें वाक्य व 'माणसाला चार पाय असतात' हें वाक्य, या दोन्हीं वाक्यांचें स्वरूप सारखेंच आहे. पण पहिलें वाक्य सत्य आहे; तर दुसरें वाक्य असत्य आहे. याचें कारण असें कीं, पहिल्या वाक्याला संवादी (corresponding) असलेली 'टेबलाला चार पाय असणें' ही घटना विश्वांत आहे. उलट, दुसऱ्या वाक्याला संवादी अशी कोणतीच घटना विश्वांत नाहीं. अर्थात कोणत्याहि वाक्याचें सत्यत्व इतर वाक्यांवर अवलम्बून नसून विश्वांतील एखाद्या विवक्षित घटनेवर अवलम्बून असतें. सत्याच्या या व्याख्येला 'Correspondence Theory of Truth' असें म्हणतात.

सत्याविषयींच्या या मताचे फारच दूरगामी परिणाम होतात. सुसम्बद्धता ही सत्याची कसोटी होऊं शकत नाहीं, असें एकदां मानल्यावर केवळ तर्कानें विश्वाविषयीं ज्ञान होऊं शकत नाहीं, हें सिद्ध होतें. तर्काच्या आधारें एक वाक्य दुसऱ्या वाक्याशीं सम्बद्ध आहे कीं नाहीं एवढेंच कळेल, पण तीं वाक्यें सत्य आहेत कीं नाहींत हें कधींच कळणार नाहीं. तें कळावयाला सृष्टीचें प्रत्यक्ष अवलोकन करावें लागेल. 'टेबलाला चार पाय असतात कीं नसतात' हें टेबल प्रत्यक्ष पाहून त्याचे पाय मोजल्याशिवाय मुळींच कळणार नाहीं. अर्थात प्रत्यक्ष अवलोकना-शिवाय सृष्टीचें ज्ञान होणें शक्य नाहीं, हा रसेलचा दुसरा सिद्धान्त आहे.

'प्रत्यक्ष' हेंच एकमेव प्रमाण आहे असें आपल्याकडे चार्वाकानें म्हटलें म्हणून इतर तत्त्वज्ञानीं त्याची रेवडी उडविली. या तत्त्वज्ञांपैकी कुणालाच त्याच्या म्हणण्यांतील मर्म कळलें नाहीं असें म्हणणें भाग आहे. आधुनिक प्रत्यक्षवादा-(Empiricism)-चा तोंडवळा चार्वाकवादाशीं इतका जुळतो कीं, समकालीनांना व अनेक वर्षेंपर्यंत उत्तर-कालीनांना








देखील आकलन न होणारें महान् प्रमेय मांडल्याबद्दल त्या निर्भीड व प्रतिभाशाली तत्त्वज्ञाबद्दल नितान्त आदर वाटतो.

## रसेलच्या दृष्टींतून मार्क्सवाद

सृष्टीचें ज्ञान प्रत्यक्षाशिवाय होणें शक्य नाहीं व एक सत्य दुसऱ्या अनेक सत्यांपासून स्वतन्त्र राहूं शकतें, या दोन गोष्टी एकदां मानल्यावर 'शास्त्रीय' म्हणून सम्बोधल्या जाणाऱ्या अनेक विचारप्रणाली धाडकन् कोलमडून पडतात. उदाहरणार्थ, शास्त्रीय म्हणून समजला गेलेला मार्क्सवाद घ्या. मार्क्स सर्व विश्वाला आपल्या विरोधविकासवादाच्या दावणींत गोंवू इच्छितो. 'महायुद्ध होणार कीं नाहीं' 'परिस्थिति जास्त महत्त्वाची आहे कीं आनुवंशिकता जास्त महत्त्वाची आहे', 'जगामध्यें भांडवलशाही अर्थरचना बदलून त्या जागीं समाजवादी अर्थव्यवस्था प्रस्थापित होणार कीं नाही' या सर्व प्रश्नांचें उत्तर मार्क्सवादी आपल्या विरोधविकासांत हुडकण्याचा प्रयत्न करतात. सृष्टीची उत्पत्ति केव्हां झाली याचें गणित बायबलाच्या आधारें करणारे ख्रिस्ती धर्ममार्तण्ड व काश्मीरच्या मुसलमानांना पुन्हां हिंदुधर्मांत घ्यावें कीं नाहीं या प्रश्नाचा निकाल मनुस्मृतीच्या आधारें लावणारे काशीचे सनातनी पण्डित, हे दोघेहि मार्क्सवाद्यांचेच जवळचे नातलग आहेत ! आनुवंशिकता जास्त महत्त्वाची कीं परिस्थिति जास्त महत्त्वाची, असल्यासारखे प्रश्न प्राणिशास्त्रांत शेंकडों वर्षें प्रयोग करून व त्यांचें प्रत्यक्ष अवलोकन करूनच सुटण्यासारखे आहेत. 'प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय बाकी सर्व थोताण्ड आहे' हें चार्वाकाचें औषध मार्क्सवाद्यांच्या जेवढें अधिक पचनीं पडेल तेवढें बरें ! प्रयोगशाळेंतील अवलोकनावर आपली भिस्त न ठेवता मार्क्सप्रणीत पोथ्यांचा कीस पाडून वैज्ञानिक सिद्धांतांचा खरेखोटेपणा पाहतां येणें शक्य नाहीं. 'विरोधविकासवाद ही केवळ एक तार्किक विचारसरणी आहे. केवळ तर्कानें फक्त आपल्याला दोन वाक्यें एकमेकांशीं सुसम्बद्ध आहेत कीं नाहींत, एवढेंच कळूं शकतें. तीं वाक्यें खरीं आहेत का नाहींत, हें कळूं शकत नाहीं. प्रत्येक वाक्याचें सत्यत्व हें त्यासाठीं जरूर असलेलें प्रत्यक्षसिद्ध अवलोकन केल्यानेंच कळूं शकेल. सर्व सृष्टीचें सूत्र सांगणारा एखादा वाद हें काम करूं शकणार नाहीं.

रसेलचें हें मत एकदां मानलें कीं, निरनिराळ्या विचारप्रणालींनीं प्रसृत केलेला आततायीपणा नाहींसा होतो. 'आनुवंशिकता विरुद्ध परिस्थिति' हाच मुद्दा घ्या. एखाद्या विचारप्रणालीवर दृढ श्रद्धा असलेला मनुष्य यावर चटकन् मत देऊन टाकील. मार्क्सवादी म्हणेल : "अहो, यांत काय कठिण आहे ? आनुवंशिकतेचें महत्त्व भांडवलवाल्यांनीं आपलें आसन टिकविण्यासाठीं माजवून ठेवलें आहे. विरोधविकास हा मानवी इतिहासाचा नियम आहे. वर्गयुद्धामुळें समाजांत सारखा बदल होत असतो व विशिष्ट विचारप्रणाली हें वर्गयुद्धांत विशिष्ट वर्गाला उपयोगी पडणारें साधन असतें. परिस्थितीपेक्षां आनुवंशिकता जास्त महत्त्वाची आहे हें मत भांडवलवाल्यांना उपयोगी पडतें म्हणून भांडवलवाल्यांच्या हातीं सत्ता आहे तोंपर्यंत हें मत खरें भासतें. पण 'विरोधविकासवाद' शेवटीं श्रमजीवी वर्गाला कायमचा विजय मिळवून देणार असल्यामुळें या वर्गाला उपयोगी असलेलें 'आनुवंशिकतेपेक्षां परिस्थिति श्रेष्ठ आहे' हें मत देखील कायमचें विजयी होईल व खरें ठरेल." याविरुद्ध वर्णाश्रमव्यवस्थेवर श्रद्धा असलेला सनातनी म्हणेल : "अहो, या मुद्द्याचा निकाल लावणें काय कठिण आहे ? ईश्वरानें चार वर्ण निर्माण केले व त्यांच्या नियतकर्तव्याला आवश्यक असे गुणधर्महि त्यांच्या अंगीं बाणविले. अर्थात् ब्राह्मणाचें ब्राह्मणत्व व शूद्राचें शूद्रत्व हें जन्मसिद्ध व ईश्वरसिद्ध आहे. विश्वामित्रानें जंगजंग पछाडले तरी त्याला जन्मसिद्ध क्षत्रियत्वाचा पूर्णपणें त्याग करून खरें ब्राह्मण्य मिळवितां आलें नाहीं. मोठा साबणानें धुतला तरी काय कावळ्याचा बगळा होणार आहे ? उपजत गुणधर्म कसल्याहि परिस्थितीवर मात करून आपलें सामर्थ्य प्रकट करणारच. परिस्थितीपेक्षां आनुवंशिकता श्रेष्ठ आहे हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे."—मार्क्सवादी व सनातनी या दोघांना दोन ध्रुवांइतकीं परस्परविरोधी अशीं दोन मतें 'सूर्यप्रकाशाइतकीं स्पष्ट' व सत्य वाटतात ! अशा दोन लोकांच्या वादाचा निकाल बुद्धिवादानें कसा








लागणार ! अशा वादांचा निकाल शेवटीं कुणाचा दण्डा जास्त लांब व कुणाच्या बाहूंत जास्त बळ यावरूनच ठरणार !

याच्या उलट, आनुवंशिकता जास्त प्रभावी कीं परिस्थिति जास्त प्रभावी हा प्रश्न एखाद्या जीवशास्त्रज्ञाला विचारला तर तो उत्तरेल : "या प्रश्नाचें उत्तर मला आजच देतां येणार नाहीं. सारख्याच परिस्थितींत वाढलेल्या पण ज्यांची जातकुळी भिन्न आहे अशा लाखों व्यक्ती निरीक्षून त्यांच्यांत कितपत साम्य आहे, हें मला अभ्यासावें लागेल. त्याचप्रमाणें ज्यांची जातकुळी एकच आहे पण ज्या अगदीं भिन्न परिस्थितींत वाढल्या आहेत अशा लाखों व्यक्ती निरीक्षून त्यांच्यांत किती साम्य आहे, हें मला अभ्यासावें लागेल. पहिलें साम्य दुसऱ्या साम्यापेक्षां ढळढळीतपणें अधिक भरलें तर परिस्थिति आनुवंशिकतेपेक्षां श्रेष्ठ आहे, असें म्हणावें लागेल. उलट, दुसरें अधिक भरलें तर आनुवंशिकता परिस्थितीपेक्षां श्रेष्ठ आहे, असें मानावें लागेल. पण अशा तऱ्हेचें संपूर्ण अवलोकन करून या प्रश्नाचें निश्चित उत्तर देणें निदान येतीं शम्भर वर्षें तरी शक्य नाहीं. ज्यांची जातकुळी अगदीं एक आहे अशा व्यक्ती म्हणजे जुळीं भावंडें. एक लाख जुळीं भावंडें सांपडणें व त्यांतूनहि तीं नेमकीं वेगवेगळ्या परिस्थितींत वाढलेलीं सांपडणें जवळ जवळ अशक्यच आहे. त्याचप्रमाणें ज्यांची जातकुळी भिन्न आहे पण ज्या अगदीं सारख्याच परिस्थितींत वाढल्या आहेत अशा लाख व्यक्ती मिळणें देखील जवळ जवळ अशक्यच आहे. तेव्हां अशा तऱ्हेच्या शें–दोनशें व्यक्तींचेंच केवळ अवलोकन करून परिस्थिति व आनुवंशिकता हीं दोन्हींहि महत्त्वाचीं आहेत, एवढेंच केवळ आज सांगतां येणें शक्य आहे."

शास्त्रज्ञाला जे प्रश्न उत्तर न देण्याइतके कठिण वाटतात ते प्रश्न सर्व विश्वाला एका दावणींत गोंवणाऱ्या एखाद्या तत्त्वावर श्रद्धा असणाऱ्यांना सहज सुटण्यासारखे वाटतात ! याचें कारण असें कीं, कोणत्याहि विधानाचा खरेपणा सृष्टीचें 'चक्षुर्वै सत्यम्' अशा तऱ्हेनें अवलोकन केल्याशिवाय पडताळतां येत नाहीं, अशी शास्त्रज्ञांची श्रद्धा असते. उलट, एकसत्यवाद्यांची प्रत्यक्षाव्यतिरिक्त एखाद्या अतींद्रिय प्रमाणावर श्रद्धा असते. यामुळें शास्त्रज्ञांजवळ प्रत्येक प्रश्नाला हमखास उत्तर नसतें. अनेक प्रश्नांबद्दल आजवर असकें दिसून आलें आहे, एवढेंच तो सांगूं शकतो. उलट, एकसत्यवाद्यांजवळ कोणत्याहि कठिण प्रश्नाचें हमखास उत्तर असतें. शास्त्रज्ञ विनयशील असतो. उलट, एकसत्यवादी उर्मट व हेकेखोर असतो. दोन शास्त्रज्ञांत विरोध असला तरी एकवाक्यता होणें शक्य असतें; उलट, दोन एकसत्यवाद्यांमध्यें कधींहि एकवाक्यता होणें शक्य नसतें. कारण, दोघेहि स्वतःला सर्वज्ञ व प्रमादरहित समजत असतात. कोणत्याहि शास्त्रीय सिद्धान्तावर मतभेद झाल्यामुळें रक्तपात झाल्याचें उदाहरण विज्ञानाच्या सर्व इतिहासांत एक देखील नाहीं; उलट एकसत्यवाद व त्याचें सर्वांत मोठें आगर जो धर्म, त्यांत मतभेद झाल्यामुळें रक्तपात, जाळपोळ वगैरे प्रत्यहीं घडल्याचीं उदाहरणें मानवी इतिहासांत शेंकडों आहेत. न्यूटनचें पदार्थविज्ञान आइन्स्टाइननें अपुरें ठरविलें म्हणून न्यूटनवादी व आइन्स्टाइनवादी यांच्या लढाया झाल्या नाहींत. पण खिस्ताला ईश्वराचा प्रेषित मानावें कीं मुलगा मानावें या मुद्द्यावर मात्र खिस्ती व मुसलमान यांच्या शेंकडों वर्षें लढाया झाल्या !

## सृष्टीचा अभ्यास खण्डशःच केला पाहिजे

रसेलच्या विचारांमध्यें अनेक स्थित्यन्तरें घडलीं आहेत. इतकीं कीं, कधीं कधीं त्याच्या एका पुस्तकांतील विचार दुसऱ्या एखाद्या पुस्तकांतील विचारांशीं अगदीं विरोधी असतात. पण त्याच्या सर्वच तत्त्वज्ञानांत कधींहि न ढळणारा असा एखादा विचार जर सांपडत असेल तर तो हा कीं, सृष्टीचा अभ्यास खण्डशःच केला पाहिजे. 'यस्मिन् विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवति' 'जें जाणल्यानें सर्व कांहीं जाणल्यासारखें होतें' असें कोणतेंहि तत्त्व सृष्टींत नाहीं; निदान, तें आहे, असें मानण्यास कोणतेंहि प्रमाण नाहीं. अशा एखाद्या तत्त्वाच्या मागें लागणें म्हणजे बौद्धिक आलस्य आहे. शेंकडों वर्षें प्रयोग व अवलोकन केल्याशिवाय एखाद्या यःकश्चित् सत्याचें देखील निश्चित ज्ञान होणें कठिण आहे. 'एकदां समाधीची डुलकी लागल्यामुळें, आम्ही सर्वज्ञ झालों' असा तोरा मिरविणारे लोक अहंमन्य व स्वतःची फसवणूक करणारे आहेत.










सत्यज्ञान क्षणशः व कणशः वेंचावें लागतें. क्षणार्धांत सर्वज्ञ होऊं पाहणारे लोक सत्याचे उपासक नसून ज्ञानाचे द्वेष्टे आहेत. रसेलच्या तर्ककर्कश विचारसरणींत हें तत्त्व सर्वत्र भरून राहिलेलें आहे.

आतांपर्यंतच्या विवेचनांत जो मुद्दा मांडला तो जरी रसेलच्या तत्त्वज्ञानांतील फार महत्त्वाचा मुद्दा असला तरी त्याच्या तत्त्वज्ञानांत याव्यतिरिक्त कांहीं नाहीं, अशी कुणी आपली समजूत करून घेऊं नये. रसेलनीं तर्कशास्त्र, गणित, मानसशास्त्र, शिक्षणशास्त्र, विवाह, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रांत क्रांतिकारक व मूलगामी विचार मांडले आहेत, हें वर सांगितलेंच आहे. त्या सर्वांचा येथें परामर्श घेणें शक्य नाहीं. येथें चर्चिलेला मुद्दा त्यांच्या सर्वच लिखाणांत या ना त्या स्वरूपांत आढळत असल्यामुळें येथें फक्त तोच निवडला आहे एवढेंच.

---

# कृतज्ञतापूर्वक स्वीकार— आणि विनंति

'नवभारत' मासिकाच्या लेखक—हितचिंतकांचें अनौपचारिक संमेलन ता. ८ ऑक्टोबर १९५० रोजीं झालें, त्याचें थोडक्यांत प्रतिवृत्त वाचकांना गेल्या नोव्हेंबरच्या नवभारताच्या अंकांत सादर केलेंच आहे. 'नवभारता'ची उपयुक्तता वाढती ठेवून त्याला येणारी आर्थिक तूट कशी भागवावयाची याबद्दल संमेलनांतील चर्चेत अनेक सूचना पुढें आल्या. त्यापैकीं एक अशी होती कीं, 'नवभारता'नें केवळ वर्गणीवरच अवलंबून न राहातां ज्यांना 'नवभारत' करीत असलेल्या कार्याची उपयुक्तता पटत असेल त्यांच्याकडून वर्गणीशिवायहि इतर यथाशक्ति आर्थिक साहाय्य किंवा देणग्या मिळवाव्यात.—ही सूचना पाहून नव्हे, परंतु स्वतंत्र उत्स्फूर्तपणें एक वाचकभगिनी 'नवभारता' स ९ रु. वर्गणीपेक्षांहि जास्त म्हणजे १२ रु. पाठवून वार्षिक वर्गणीदार झाल्या आहेत. त्या वाचकभगिनी म्हणजे नागपूरच्या सूतिकागृहाच्या डॉ. इन्दु देव या आहेत. त्यांना ही कल्पना नाशिकच्या 'आयुर्वेदपत्रिका' या पाक्षिकांतील एका वाचकाच्या पत्रावरून कशी सुचली याबद्दल त्यांनीं आपल्या पत्रांत जें स्पष्टीकरण केलें आहे त्यावरून त्यांची भूमिका स्पष्ट होईल. त्या लिहितात: "मी 'आयुर्वेदपत्रिका' नांवाचें पाक्षिक घेतें. त्यांत 'सदसद्विवेकबुद्धीला आवाहन' या सदराखालीं खालील मजकूर वाचला: 'आयुर्वेदपत्रिकेची उपयुक्तता आम्हांस पटली आहे. आपल्या या संकल्पाला सर्वांचें सहकार्य असावें म्हणून आपण सुचविल्याप्रमाणें ६ रु. वार्षिक वर्गणीदाखल पाठविले आहेत. स्वेच्छेनें ४ रु. ऐवजीं ६ रु. देण्याची कल्पना समाजांतील नैतिक पातळी वाढविण्यास उपकारक होईल असें माझें प्रांजल मत आहे. मनुष्याच्या सदिच्छेला व सदसद्विवेकबुद्धीला आवाहन करण्याची ही आपली अभिनव कल्पना वैद्यवर्गानें फलद्रूप करावी.'—हा उपक्रम 'नवभारतां'तहि सुरू केला पाहिजे. ...तुमच्याकडे १२ रु. मनीआर्डरीनें पाठवीत आहे. माझ्यापासूनच या गोष्टीस सुरवात करतें." —— डॉ. इन्दु देव यांच्या शुभ प्रेरणेचें मनःपूर्वक स्वागत करून त्यांनीं स्वेच्छेनें केलेल्या या साहाय्याचा आम्हीं साभार स्वीकार करतों.

डॉ. इन्दु देव यांनीं वर 'आयुर्वेद—पत्रिके'चा उल्लेख केला आहे. आम्हांलाहि नियतकालिकसृष्टींतील इतरहि कांहीं उदाहरणें अशीं माहीत आहेत कीं, ज्या नियतकालिकांना त्यांचे वाचक वर्गणीच्या रकमेपेक्षांहि अधिक द्रव्यसाहाय्य देऊन, ज्याची उपयुक्तता आपल्याला पटली आहे अशा आपल्या नियतकालिकास निकोपपणें जगविण्याचा प्रयत्न करीत असतात. डॉ. इन्दु देव यांनीं उत्स्फूर्तपणें सुरू केलेल्या या उपक्रमाचें, त्याचप्रमाणें 'नवभारतां'च्या लेखकहितचिंतकसंमेलनांत केलेल्या सूचनेचें निमित्त साधून आम्हीही वाचकांना अशी विनंति करतों कीं, त्यांनीं 'नवभारता'ला ९ रु. वर्गणीव्यतिरिक्त यथाशक्ति द्रव्यसाहाय्य स्वतः करावें; तसेंच आपल्या परिसरांतील इतर व्यक्ती वा संस्था यांच्याकडून तें मिळवून द्यावें. अशा साहाय्याची 'नवभारता'च्या अंकांतून आम्हीं आनंदानें कृतज्ञतापूर्वक पोंच देऊं.

—कार्यकारी संपादक



अनुक्रमणिका






# सारसंकलन

## अलीगडमध्यें दोन प्रवाहांचा संगम

स्वातंत्र्यपूर्व काळीं राजकीय दृष्ट्या प्रतिगामी वृत्तीचा बालेकिल्ला म्हणून अलीगड मुस्लिम युनिव्हर्सिटी प्रसिद्ध होती. आतां स्वातंत्र्योत्तर काळीं तेथील वातावरण कसें बदललें आहे याचें विवेचन दिल्ली येथील 'नयी रोशनी' या उर्दू साप्ताहिकाचे संपादक डॉ. सैयद आबिद हुसेन यांनीं त्यांच्या साप्ताहिकांत केलें आहे. त्याचा श्री. श्रीपाद जोशी यांनीं केलेला अनुवाद खालीं दिला आहे :

" मुसलमानांच्या बौद्धिक व राजकीय पुरोगामित्वाचे जे दोन प्रवाह सुमारें शंभर वर्षांपासून वेगवेगळे वाहत होते, ते आतां एकत्र मिसळून एक झाले आहेत अथवा होणार आहेत. आतांपर्यंत या मतभेदांमुळें मुस्लिम जमातीची बुद्धि दोन भागांत विभागली गेली होती आणि त्या दोन भागांचा एकमेकांशीं कांहींहि संबंध उरला नव्हता. बौद्धिक द्वैत हा एक मानसिक रोग आहे आणि तो वाढतां वाढतां वेडेपणापर्यंत जाऊन पोहोंचतो, याचें प्रत्यक्ष उदाहरण गेल्या कांहीं वर्षांत आपण आपल्या डोळ्यांनीं पाहिलेलें आहे. या रोगांतून मुक्त होणें हा मुसलमानांच्या दृष्टीनें एका नव्या जीवनाचा संदेश आहे.

" बौद्धिक पुरोगामित्वाचा पाया सर सैयद अहमद यांनीं घातला होता; त्यांनीं सामान्यतः सर्व हिन्दी लोकांच्या--विशेषतः मुसलमानांच्या--डोक्यांतून मध्ययुगीन कल्पनांचीं कोळिष्टकें झाडून त्यांचीं मनें आधुनिक युगाच्या प्रकाशानें उजळून टाकलीं. देशाच्या एका मोठ्या विभागांत त्यांचेच अविरत परिश्रम, हिम्मत व दृढता यांच्या योगें इंग्रजी भाषा व आधुनिक विद्या यांचें शिक्षण लोकप्रिय होऊं शकलें. परंतु या बौद्धिक पुरोगामित्वाबरोबरच सर सैयद यांनीं राजकीय क्षेत्रांत जी प्रवृत्ति स्वीकारली तिला जरी प्रतिगामी म्हणतां आलें नाहीं, तरी ती संधिसाधू ( opportunist ) होती, यांत शंका नाहीं. तरी पण त्यांची इंग्रजमैत्री ही निव्वळ तात्पुरत्या संधिसाधूपणाच्या भुसभुशीत पायावर आधारलेली नसून सांस्कृतिक संस्करणाच्या भरीव पायावर आधारलेली होती. ते आपल्या राष्ट्रांत व जातींत आधुनिक संस्कृति व आधुनिक शास्त्रें यांचा प्रचार करूं इच्छीत होते. आणि त्यासाठीं हिंदुस्थानांत नव्या संस्कृतीचे प्रतिनिधी या नात्यानें आलेल्या इंग्रजांशीं मैत्री ठेवणें त्यांना जरूर होतें. सर सैयदांना ही गरज इतकी भासली कीं, तिच्यामुळें त्यांना इंग्रजी सत्तेचा उज्ज्वल पैलूच दिसला; तिची काळोखी बाजू त्यांना दिसली नाहीं. परंतु त्यांच्यानंतर अलीगडमध्यें सांस्कृतिक पुनरुत्थापन अथवा धर्मसंस्करण हें फक्त नांवाचेंच राहिलें. इंग्रज सरकारची मर्जी सांभाळण्याच्या बाबतींत मात्र सर सैयद यांच्या अनुयायांनीं त्यांच्यापुढें पुष्कळच आघाडी मारली.

" मुसलमानांना राजकीय पुरोगामित्वाचा पाठ परकीय राजवटीपासून सुटका करून घेण्याच्या अभावात्मक स्वरूपात मशिदींतील व धार्मिक पाठशाळांतील जुन्या वळणाच्या लोकांनीं पढविला. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत स्वातंत्र्याची कल्पना फक्त देवबन्द ( बिहार ) विद्यापीठांतच विकास पावत होती. मरहूम शेख उलहिंद मौलाना महमूद उलहसन यांनीं विसाव्या शतकाच्या सुरुवातीस या कल्पनेला एका व्यावहारिक व प्रत्यक्ष आंदोलनाचें स्वरूप दिलें. देवबन्दाच्या बाहेर मौलाना शिबली यांनीं आपल्या लेखणीनें स्वातंत्र्याच्या चळवळीची सेवा केली आणि मौलाना अबुल कलाम आझाद यांनीं आपल्या चिंतनानें व आचरणानें

स्वतःला त्या चळवळीस वाहून घेतलें. परंतु स्वातंत्र्याची ही लाट इंग्रजी सत्तेबरोबरच पाश्चात्य संस्कृतीस व सामान्यतः वर्तमानकाळांतील आधिभौतिक व बौद्धिक प्रगतीलाहि विरोध करणारी होती. यांचें एक कारण असें होतें कीं, स्वातंत्र्याच्या चळवळीचें नेतृत्व करणारे हे लोक धार्मिक वर्गांतील होते. अशा लोकांची प्रवृत्ति स्वभावतःच जुन्या काळाकडे डोळे लावून बसण्याची असते. शिवाय दुसरें कारण असें कीं, नवीन जमाना व त्यांतील सुधारणा या गोष्टी त्यांच्या देशामध्यें स्वातंत्र्याच्या शत्रूंच्या द्वारें आलेल्या होत्या आणि त्यांच्यासाठीं गुलामीचा संदेश घेऊन आल्या होत्या. ज्याप्रमाणें सर सैयद आणि त्यांचे सहकारी यांच्यांतील बौद्धिक व सांस्कृतिक सुधारणेच्या इच्छेनें त्यांना इंग्रजी राजवटीशीं सलोख्याचे संबंध ठेवण्यास भाग पाडलें त्याचप्रमाणें, धार्मिक प्रवृत्तीच्या विद्वानांमधील इंग्रजी सत्तेच्या विरोधानें त्यांना आधुनिक शास्त्रें, आधुनिक संस्कृति, यांच्याशीं असहकार करण्यास भाग पाडलें.

" खिलाफतीच्या चळवळीच्या काळांत जेव्हां धार्मिक वर्ग मरहूम शेखउल हिन्द व मौलाना आझाद यांच्या नेतृत्वाखालीं आणि आधुनिक पद्धतीनें शिक्षण घेतलेला वर्ग मौलाना मुहम्मदअली यांच्या नेतृत्वाखालीं एका व्यासपीठावर एकत्र आले होते, तेव्हां बाह्यतः असें दिसत होतें कीं, मुसलमानांतील बौद्धिक व राजकीय पुरोगामित्वाचे प्रवाह एकमेकांत मिसळून एक झाले आहेत. परंतु थोड्याच दिवसांनंतर असें आढळून आलें कीं, ती एक तात्पुरत्या भावनांची लाट होती व तिनें दोन्ही वर्गांना एकत्र आणलें होतें. या एकीकरणाचा पाया हार्दिक ऐक्यावर आधारलेला नव्हता. पुढें लौकरच हे दोन्ही प्रवाह स्वतंत्रपणें वाहूं लागले; परंतु त्यांच्या तात्पुरत्या संयोगाची स्मृति जामिया मिल्लिया ( या दिल्लीच्या मुस्लिम विद्यापीठा ) च्या रूपानें बाकी राहिली.

" गेल्या कांहीं वर्षांत ज्या वेळीं हिंदुस्तानांतील इंग्रजी सत्तेचीं मुळें खिळखिळीं होऊं लागलीं होतीं, त्या वेळीं मुसलमानांतील या बौद्धिक दुहीनें मानसिक संकटप्रसंगा-( mental crisis )चें स्वरूप धारण केलें आणि त्याचा परिणाम म्हणून हिंदुस्थानची फाळणी झाली. म्हणजे वस्तुतः मुसलमानांचें सामुदायिक शरीर करवतीनें कापून त्याचे दोन तुकडेच करण्यांत आले.

" कांहीं प्राण्यांमध्यें अशी शक्ति असते कीं, त्यांचें शरीर दोन तुकड्यांमध्यें विभागलें गेल्यानंतर प्रत्येक तुकडा हा पुन्हां पूर्वीप्रमाणें संपूर्ण शरीर बनतो. आपल्यापुढें या वेळीं सर्वांत महत्त्वाचा प्रश्न हा आहे कीं, मुसलमानांच्या जमातीचा जो तुकडा हिंदुस्थानांत उरला आहे तो पुन्हां पूर्वीप्रमाणें संपूर्ण शरीर बनूं शकेल कीं नाहीं ? असें बनण्यासाठीं सर्वांत महत्त्वाची व अपरिहार्य अट ही आहे कीं, ज्या बौद्धिक द्वैतभावनेंमुळें ही शोककारक घटना घडून आली आहे, ती भावना नष्ट झाली पाहिजे. राजकीय पुरोगामित्व आणि बौद्धिक पुरोगामित्व यांच्या शक्ती एकमेकींना मारक ठरण्याऐवजीं त्या दोन्ही एकत्र येऊन त्यांची एक भरीव व ठोस शक्ति बनली पाहिजे. २० फेब्रुवारी १९४९ रोजीं अलीगढच्या मुस्लीम युनिव्हर्सिटीच्या पदवीदानप्रसंगीं असें दिसून आलें कीं, ही अट आतां पूर्ण झालेली आहे.

" ज्या वेळीं मौलाना अबुल कलाम आझाद आपल्या भाषणांत सर सैयद यांच्या बौद्धिक पुरोगामित्वाला श्रद्धांजलि अर्पण करीत होते त्यावेळीं असा भास झाला कीं, जणूं सर सैयद यांचा आत्मा आझादांच्या राजकीय पुरोगामित्वाला शुभाशीर्वाद देत आहे; पुरोगामित्वाचे दोन्ही प्रवाह अलीगढ येथें येऊन एक झाले आहेत; जीवनाचे दोन्ही अपूर्णांक मिळून एक पूर्ण संख्या बनली आहे.

" ईश्वर करो आणि ही कल्पना खरी ठरो. अलीगढ हा पुरोगामित्वाच्या दोन्ही प्रवाहांचा संगम बनो. येथून पुरोगामित्वाचा सामायिक प्रवाह आवेशानें व वेगानें वाहूं लागो आणि देशाच्या आम जीवनाच्या महानदीमध्यें मिसळून तो तिच्या प्रगतीची मंद गति वेगवान् बनवो. "

## ति बे ट

लाल चीननें तिबेटवर स्वारी करून आपलें स्वामित्व शस्त्रांच्या साह्यानें प्रस्थापित करण्याचा प्रयत्न चालविल्यापासून लाल राजवटीखालील राष्ट्रांशीं शांततेनें व सलोख्याच्या मार्गानें विचारविनिमय








करून तंटे मिटविणें खरोखर शक्य आहे कीं नाहीं याविषयीं कोणाहि शांतताप्रिय माणसाला–तो कितीहि पुरोगामी विचाराचा असला तरीहि–शंका आल्यावांचून राहणार नाहीं. तिबेटचें प्रतिनिधिमंडळ कालिम्पाँगला हाँगकाँगच्या प्रवासपरवान्याची वाट पाहत तिष्ठत असतांच लाल सैन्यें तिबेटांत घुसलीं. तिबेटशीं संबंधित अशा भारताला कांहींच कळविण्यांत आलें नाहीं; उलट, १९१४च्या तहान्वयें ठेवलेल्या लष्करी तुकड्या काढून घेण्याची सूचना भारताला करण्यांत आली आहे. नेपाळमध्यें राज्यकारभारांत बदल होत असून चीनच्या आक्रमणाची भीति त्याला वाटत आहे. म्हणून तिबेटसंबंधींची भूमिका समजून घेणें इष्ट आहे.

"एशिॲटिक रिव्ह्यू"च्या ऑक्टोबरच्या अंकांत "आजचा तिबेट" या विषयावर मि. ए. जे. हॉप्‌किन्सन्, सी.आय.ई. यांचा एक लेख आलेला आहे. मि. हॉप्‌किन्सन् हे स्वातंत्र्यापूर्वी स्वतंत्र भारतांतहि सिक्किम संस्थानांत पोलिटिकल ऑफिसर म्हणून होते. तत्पूर्वी ते चित्रळ संस्थानांत होते. सिक्किममध्यें असतांना ते तिबेटबरोबरच्या भारताच्या संबंधांचे जबाबदार अधिकारी होते. लंडनच्या 'ईस्ट इंडिआ ॲसोसिएशन' पुढें तिबेट-प्रश्नावर २८ जुलै १९५० रोजीं चर्चा झाली. चर्चासभेचे अध्यक्ष सर ओलाफ कॅरो हे होते. त्या सभेपुढें हॉपकिन्सन् यांनीं तिबेटसंबंधीं आपला निबंध वाचला. त्यावर सभेमध्यें अनेक अनुभवी सदस्यांनीं चर्चा केली. त्या चर्चेचा सारांश उपरिनिर्दिष्ट अंकांत दिलेला संक्षेपानें अनुवादित करून खालीं दिला आहे.

" मि. हॉप्‌किन्सन् म्हणाले :

'तिबेटबद्दल भारताला वाटणारी काळजी केवळ व्यापाराबाबतची नाहीं. खरे हितसंबंध राजकीय लष्करी आहेत. ('सिमला करारा'प्रमाणें झालेल्या) तहान्वयें ग्यान्त्से व यातुंग या ठिकाणीं ठेवलेलें लष्कर केवळ शोभेचें होतें. जास्त भक्कम लष्करी छावणीची या भारताच्या उत्तर सीमेवर अजूनपर्यंत गरज नव्हती. पण प्रतिपक्षीय सत्तेच्या हातीं तिबेट गेल्यास जगांतील या सर्वोच्च बुरुजावरून किंवा पठारावरून कलकत्ता किंवा उत्तर हिंदचा सपाट प्रदेश यांवर वैमानिक फेरी मारायला तिला किती सोयीचें होईल हें पाहणें महत्त्वाचें आहे....

'वंशदृष्टीनें पाहतां तिबेटी लोक मंगोलियन असले तरी चिनी नव्हेत. त्यांनीं कांहीं गोष्टी चिनी संस्कृतीपासून घेतल्या तशा त्या हिंदी संस्कृतीपासूनहि घेतल्या. चीनपासून त्यांनीं आहारादिकांचे आणि कपड्यालत्त्याचे रीतीरिवाज उचलले; हिंदुस्थानाकडून त्यांनीं बौद्धधर्म घेतला.

'राजकीय दृष्टीनें पाहतां ऐतिहासिक कालांतील बहुतेक शतकें तिबेट चीनपासून स्वतंत्र होता. इ. स. १७२० मध्यें चिनी बादशहानें त्यांवर अधिराज्य मिळविलें; पण गेल्या शतकाच्या अखेरीस ही सार्वभौम सत्ता केवळ नाममात्र राहिली होती. १९०४ मध्यें ब्रिटिशांनीं यंगहसबंडच्या आधिपत्याखालीं शिष्टमंडळ पाठवून ल्हासा मुक्कामीं हिंदुस्थान व तिबेट यांमधील संबंधाबद्दल स्वतंत्रपणें विचारविनिमय सुरू केला. या सुमारास अंतर्गत अंदाधुंदीचा फायदा घेऊन चिनी सरकारनें आपलें अधिराज्य तेथें पुन्हां स्थापण्याचा प्रयत्न केला. पण १९११ मध्यें तिबेटी लोकांनीं त्या मंडळाला पकडून हद्दपार केलें. तेव्हांपासून आतांपर्यंत तिबेट सतत स्वातंत्र्याचा उपभोग घेत आहे.

'१९१४ सालीं ब्रिटन (हिंदुस्थान), तिबेट आणि चीन या तिघांनीं या तिबेटी स्वायत्ततेच्या प्रश्नाचा समाधानकारक निकाल जवळजवळ लावला होता. तहाच्या कच्च्या मसुद्यांत चीननें तिबेटची स्वायत्ततेची मागणी मान्य केली आणि तिबेटनें चिनी सार्वभौमत्व औपचारिक रीत्या (pro forma) मान्य केलें. पण प्रत्यक्ष हद्दी ठरवण्याबाबत बांधा आल्यामुळें चीननें तहावर प्रत्यक्ष सही केली नव्हती. ब्रिटिश सत्ता आणि तिबेट यांनीं मात्र हा १९१४ चा तह बंधनकारक मानला व आजच्या हिंदी-तिबेटी संबंधांचा पाया तोच तह आहे...

'तिबेट सरकारचा विचार ब्रिटन, अमेरिका, हिंदुस्थान, नेपाळ आणि चीन या राष्ट्रांकडे शिष्टमंडळें पाठविण्याचा होता. पण (कम्यूनिस्ट) चीननें धमक्या दिल्यामुळें फक्त चीनकडे जावयाचें प्रतिनिधिमंडळच मात्र कालिम्पाँगहून निघालें.












प्रतिनिधी हॉंगकॉंगला जावयास कलकत्याहून विमानांत चढावयाच्या तयारींत होते इतक्यांत त्यांचे परवाने रद्द करण्यांत आले आणि हिंदुस्थानांत थांबून चिनी वकिलाशीं वाटाघाटी कराव्या, असा जबाब त्यांना चीनकडून मिळाला.'

( हें शिष्टमंडळ दिल्लीशीं वाटाघाटी चालवून पुढें चीनकडे जावयास निघणार असतांनाच "तिबेटच्या सत्ताधाऱ्यांनीं निष्कारण दिरंगाई चालविल्यामुळें आम्हांस पुढें पाऊल टाकावें लागलें" असें म्हणून लाल चीननें आपलीं सैन्यें तिबेटच्या सरहद्दींत सिकियांग मार्गें घुसविलीं. )

"चर्चासभेचे अध्यक्ष सर ओलॉफ कॅरो म्हणाले कीं, 'सिकियांग प्रांत आज रशियाच्या सत्तेखालचा एक उपग्रह बनला आहे. चीनपेक्षांहि त्याचे संबंध रशियाशीं अधिक निकटचे आहेत. या दृष्टीनेंच तिबेटकडे पाहणें महत्त्वाचें आहे. तिबेटचा पुष्कळसा भाग वाळवंटें आणि दुर्गम पर्वत यांनीं व्यापलेला आहे. भरतखंडांतील, चीनमधील आणि दक्षिण–पूर्व आशियांतील बहुतेक सर्व महत्त्वाच्या नद्या याच पहाडांत उगम पावल्या आहेत. ल्हासा, शिंगत्से आणि ग्यान्से या शहरांच्या भोंवतालच्या १००चौ. मैलांचा प्रदेशच काय तो राजकीय दृष्ट्या महत्त्वाचा आहे. ल्हासा १२००० फूट उंचीवर आहे, पण एकंदर तिबेटच्या मानानें सखल प्रदेशांतच म्हणावयाचें. तुलनेनें पाहतां हा भूप्रदेश सैनिक--केन्द्रांच्या दृष्टीनें हिंदुस्थानला अधिक जवळ आहे; चीनला अधिक दूर आहे. हिंदुस्थानांतून ल्हासाला जाणें अधिक सोपें आहे. हिंदुस्थान हेंच तिबेटचें नैसर्गिक प्रवेशद्वार आहे.'

"पंचेन लामाविषयीं व्याख्याते हॉपकिन्सन् बोलले : 'हा पंचेन लामा ( आज लाल चीनच्या हातांतील हुकुमी पत्ता ) सशास्त्र, विधिपूर्वक लामा झालेला नाहीं. एखादा बिशप निवडला जावा पण त्याला विधिपूर्वक बिशपपणा मिळूं नये तसें या पंचेन लामाचें झालें आहे. आतां त्याला लामापदीं अभिषेक कोण करणार ? आपल्या सैन्याबरोबर त्याला घेऊन येणारे लाल चीनचे मार्क्सवादी पुढारी ? परंपरागत धर्मनिष्ठेचा उपयोग फायद्याच्या वेळीं करून घ्यावयास हे साम्यवादी तयार आहेतच !'

"सर विल्यम बार्टन म्हणाले, 'तिबेट आणि हिंदुस्थान यांच्यामध्यें नेपाळ आहे, असें अध्यक्ष म्हणाले. दोनशें वर्षांपूर्वीं नेपाळी लोकांनीं तिबेटवर स्वारी करण्याचें साहस केलें आणि खूपसे मठ लुटून तेथील लोकांवर सार्वभौमत्वादाखल कर लादला. तिबेटी लोकांनीं चीनकडे मदत मागितली तेव्हां चीन तंटयांत पडून त्यानें नेपाळवर स्वारी केली आणि त्याला दंडादाखल मोठी रक्कम भरावयास लावली. २०० वर्षांपूर्वीं जर चिनी सैन्यें नेपाळवर चालून येऊं शकलीं तर तीं पुन्हां येऊं शकतीलच.'

"श्री. रामचंद्र काक ( काश्मीरचे एके काळचे कुप्रसिद्ध मुख्य प्रधान ) म्हणाले : 'आजच(लंडनच्या) 'टाइम्स' नें बातमी दिली आहे कीं लाल चीनचें सरकार १००० लोक तिबेटांत पाठविण्यास तयार करीत असून त्यांपैकीं ५०० लोक तिबेटी आहेत. तिबेटच्या मुक्तीचें प्रचारकार्य ते करणार व सुरवातीचा डाव ते खेळणार. ते दोन-दोन तीन-तीन येणार व त्यांना अडविणें लष्कराला शक्य नाहीं आणि सामाजिक व राजकीय दृष्टीनेंहि त्याला विरोध करणें कल्पनेबाहेरचें आहे. असें झालें म्हणजे एक दिवस आपणाला मॉस्को रेडियोवरून बातमी कळविण्यांत येईल कीं, तिबेटांत मुक्तिसेनेनें प्रवेश केला असून तेथें असें-असें झालें.'

"उत्तरादाखल बोलतांना मि. हॉपकिन्सन् म्हणाले कीं, 'तिबेटजवळ १२००० लष्कर आहे. अधिक भरती केली जाते असें ऐकतों. पण तिबेट हें बिनलष्करी व अनाक्रमक वृत्तीचें राष्ट्र आहे. भूतकाळांत आपल्या रक्षणाला तिबेट समर्थ असलें तरी आजच्या काळांतील संपूर्ण तयारीची चढाई जर तिबेटवर झाली तर त्याला प्रतिकार करणें मात्र अशक्य होईल. संशयित लोकांना प्रवेश देण्याबाबतचें तिबेटचें धोरण नेहमींच कमकुवतपणाचें होतें.' "

## हायड्रोजन-बॉम्ब आणि
## अमेरिकेची संरक्षणयोजना

रशियांत ॲटम बॉम्ब तयार झाल्याचें समजतांच प्रेसिडेंट ट्रूमननें हायड्रोजन बॉम्ब तयार करण्याच्या योजनेवर आपली सही करून तसा आदेश दिला. हा बॉम्ब फार लौकर तयार होण्याची शक्यता नसली



अनुक्रमणिका






तरी त्याची निर्मिति असंभवनीय नाहीं. आज अमेरिका मुख्यत: ॲटम बॉम्बच्या भीतीला प्रतिकारक म्हणूनच हायड्रोजनबॉम्बची निर्मिति करीत आहे. परंतु स्वत:च्या राष्ट्राचें संरक्षण ॲटम किंवा हायड्रोजन बॉम्बच्या सर्वविनाशक शक्तीपासून करणें अमेरिकेलाहि जवळ जवळ अशक्य आहे. या संबंधाचें आधिकृत विवेचन "सायन्टिफिक अमेरिकन्" नांवाच्या सुप्रसिद्ध वैज्ञानिक नियतकालिकांत (जूनच्या अंकांत) मि. राल्फ. ई. लॅप यांच्या लेखांत आलें आहे. या भयानक ब्रह्मास्त्रासंबंधीच्या लेखमालेंतील सदरहू चौथ्या लेखांकांत मि. लॅप यांनीं मुख्यत: नागरिक संरक्षणकार्या-(civil defence) च्या दृष्टीनें विचार केलेला आहे. मि. राल्फ ई. लॅप हे अमेरिकेच्या नाविक-संशोधन-खात्याच्या अणुविषयक भौतिकशास्त्राचे प्रमुख होते व सध्यां स्वतंत्रपणें अणुजन्य शक्तीविषयीं सल्ला देण्याचें काम करतात. लेखाचा महत्त्वाचा भाग यापुढें सारांशानें दिलेला आहे :

"या तऱ्हेच्या विनाशक अस्त्राला नेमक्या माऱ्याच्या जागा जेवढ्या अमेरिकेंत आहेत तेवढ्या इतर कोठेंहि नाहींत. येथील प्रचंड वसतीचीं शहरें व अजस्र वाढीचे कारखाने म्हणजे या अस्त्राला मोठेंच आकर्षण आहे व हीं त्याचीं निशाणें बनणें अगदीं सहजशक्य आहे. मोठा कटु असा हा विरोधाभास आहे! अमेरिका व रशिया या दोघांपैकीं रशियाच्या हातीं हें अस्त्र असणें अधिक परिणामकारक ठरणार आहे. अशा प्रकारें सध्यां आपण असें एक शस्त्र निर्माण करूं पाहत आहोंत कीं जें रशियालाहि साध्य झालें तर आपल्या विरुद्ध त्याचा उपयोग फारच नाशकारक होईल. आपण रशियाच्या अगोदर त्याची निर्मिति केली तरी त्याचा मक्ता आपल्याजवळ फारच थोडा काळ राहील. अशी अपेक्षा आहे कीं, रशिया व अमेरिका हीं दोन्ही राष्ट्रें 'फ्यूजन टाईप'चा बॉम्ब येत्या पांच वर्षांत तयार करतील, व इतर राष्ट्रें त्यानंतर कांहीं वर्षांनीं करतील.

"आपल्या हातचा ॲटम बॉम्बचा मक्ता २३ सप्टेंबर १९४९ रोजीं गेला व आपले लष्करी तज्ज्ञ हवालदील झाले. त्यावर उपाय म्हणून हायड्रोजन बॉम्बची मात्रा लागू करूं पाहणें स्वाभाविक होतें. परंतु त्या योजनेविषयींची गुप्तता फार भयंकर ठरणार आहे. सामान्य अमेरिकन नागरिकाला या शस्त्रापासून आपलें संरक्षण करण्याची माहितीहि नाहीं व या शस्त्राविषयींहि खरी माहिती नाहीं. या शस्त्राविरुद्ध करावयाच्या नागरिकसंरक्षणाच्या दृष्टीनें त्यांची माहिती जनतेला असणें अपरिहार्य आहे. लॉस एन्जेलिसच्या मेयरनें म्हटल्याप्रमाणें, अणुशस्त्राविरुद्ध करावयाच्या नागरिकसंरक्षणासंबंधींची कांहींहि माहिती अमेरिकेच्या शहरांना नाहीं–'The cities have no idea what to do about civilian atomic defence at present.'

"हायड्रोजन बॉम्बच्या आक्रमक शक्तीबद्दल कांहीं प्रमाणांत अतिशयोक्ति केली जाते. आक्रमणाचें शस्त्र म्हणून इतर रासायनिक शस्त्रांपेक्षां हा बॉम्ब अधिक परिणामकारक नाहीं किंवा आगलाव्या बॉम्बपेक्षां कमी हानिकारक नाहीं. आधुनिक युद्धांतील शस्त्रें अगोदरच इतकीं भयानक आहेत कीं त्यांत आणखी अतिशयोक्ति करावयाचें कांहींच कारण नाहीं.

"हायड्रोजन बॉम्बपासून संरक्षण करणें शक्य आहे काय? जे. रॉबर्ट ओपनहेमर यांनीं जें उत्तर एका सीनेट-कमिटीपुढें दिलें तेंच आतांहि देणें योग्य होईल : 'अणुजन्य संहारकशस्त्रांविरुद्ध इलाज आज अस्तित्वांत नाहींत व पुढें असण्याचा संभव नाहीं'. रडार-(Radar) च्या साहाय्यानें संरक्षक-कुंपणें नौका-विमान-दलानें उभीं करणें अजून शक्य झालेलें नाहीं. शिवाय हायड्रोजन बॉम्बचा रडारनें सुगावा लागला तरी त्याला वाहून आणणाऱ्या विमानांना अडविण्यासाठीं प्रतिक्षण सुसज्ज ठेवावें लागणारें विमानदळ अद्ययावत् व वरिष्ठ प्रतीचें हवें; त्यासाठीं वैमानिक रचनेंत सतत फेरबदल करावे लागणार.

"यावर कांहीं प्रमाणांत शक्य उपाय म्हणजे आपल्या कारखान्यांचें विकेन्द्रीकरण करणें हें होय. सतत अद्ययावत् विमानें व बॉम्ब तयार ठेवावयाचे तर त्यासाठीं आपल्या कारखान्यांची सुरक्षितता










राहिली पाहिजे. प्रचंड कारखाने एकत्र न ठेवतां ते विखरून टाकल्यानें कांहीं तरी बचाव करणें शक्य होईल. ज्याची तयारी अधिक तो टिकण्याचा संभव अधिक. कारण यापुढील युद्धांत आपणाला कालावधि फारच थोडा लाभणें शक्य आहे.

" या कारखान्यांपेक्षांहि आपल्या अवाढव्य शहरांचें विकेन्द्रीकरण हा अधिक कठिण प्रश्न आहे. सीनेटर ब्रिएन मॅकमोहन, जॉइन्ट कमिटी ऑफ ॲटमिक एनर्जीचे अध्यक्ष, यांनीं हायड्रोजन बॉम्बच्या हल्ल्याबाबत दिलेली भयसूचना महत्त्वाची आहे. त्यामुळें एका संध्याकाळच्या आंत नव्हे तर कांहीं मिनिटांच्या काळांत पांच कोटी अमेरिकनांचा निःपात होईल. अमेरिकेंतील शहरांच्या आकाराकडे पाहिल्यास कोणालाहि याची सत्यता पटावी. या शहरांचें संरक्षण शत्रूच्या हल्ल्यापासून होईलच, याची खात्री देतां येत नाहीं. एक डझनभर सुपर्‌बॉम्ब घेऊन शत्रूनें अचानक हल्ला केला तर मॅकमोहनचें हें भीषण भविष्य खरें ठरायची वेळ नक्की येईल. आणि कोणतेंहि राष्ट्र कितीहि दृढनिश्चयी असलें तरी आपल्या लोकसंख्येचा एकचतुर्थांश भाग असा नामशेष झाल्यावर ते तसें टिकून राहणें फारच कठिण आहे. तेव्हां अणुजन्य शस्त्रांपासून संरक्षण करावयाचें झाल्यास आपलीं शहरें विखरून टाकणें अवश्य आहे आणि नवीन शहरांची अशी वाढ थांबवणें जरूरीचें आहे...

" मोठ्या शहरांवर टाकावयाच्या शस्त्राच्या दृष्टीनें अणुबॉम्ब व हायड्रोजन बॉम्ब यांच्यांत फरक एवढाच कीं, पहिल्यामुळें मोठ्या शहराचा गाभा उखडला जातो, तर दुसऱ्यामुळें सबंध शहरच जमीनदोस्त होतें. प्रचंड वेगाचे वारे व आगी यामुळें मुख्यतः नुकसान होईल. प्रत्यक्ष न्यूट्रॉन्स व गॅमा किरणांच्या उत्सर्गाच्या कक्षेंत बहुधा शहराचा मध्यभागच येईल. या स्वरूपाच्या डझनभर 'बॉम्ब्स'-चा अमेरिकेंतील शहरांवर स्फोट झाला तर त्यामुळें रेडियो-ॲक्टिव्ह द्रव्याच्या योगें गंभीर स्वरूपाच्या आरोग्यहानीची भीति निर्माण होईल...

" विसाव्या शतकाच्या प्रथमार्धाकडे पाहिलें तर भूतकाळांतील दोन महायुद्धें दिसतात, आणि पुढें पाहूं लागलों तर शांतताप्रिय माणसाला वाटूं लागतें कीं, भविष्याच्या पडद्याआड तिसरें अधिक भयानक युद्ध तर नाहीं ना वाढून ठेवलेलें? शस्त्रास्त्रांच्या युद्धाची विफलता माणसांना पटवून द्यावयास जवळजवळ मानवजातीच्या नाशाचीच जरूरी आहे काय? आपली शक्ति व साधनें यांचा उपयोग शांततायुक्त कार्याकडे करूं देणें शक्यच नाहीं काय? वैज्ञानिक शास्त्रांची तिजोरी ज्या शक्तिसंपदेनें खचून भरलेली आहे तिचा उपयोग संस्कृति–सुधारणेला करूं देणें नाकारलेंच जाणार काय? शेवटीं हायड्रोजन बॉम्बला खरें प्रत्युत्तर अध्यक्ष रूझवेल्ट यांच्याच शब्दांत आपणास सांपडतें. 'महान् विश्वाच्या विस्तारांत आपली पृथ्वी ही एक लहानसा तारा आहे पण हीच पृथ्वी म्हणजे युद्धांनीं भयभीत न झालेला, भूक व भय यांनीं न ग्रासलेला, अर्थशून्य वंशभेदांनीं रंगभेदांनीं व तत्त्वभेदांनीं न भंगलेला एक ग्रहगोल बनविणें आपणांस शक्य आहे; फक्त आपण तसें ठरविलें पाहिजे. '..."

## प्राणिमात्रांचें प्रेमाराधन

(१) पतंगाचा प्रेमशोध—रात्रीच्या वेळीं एकत्र येणाऱ्या एका जातीच्या पतंगाला आपल्या मादीचा शोध कसा लागत असेल? काळोखांत तर त्यांना दिसत नाहीं. शिवाय नर-पतंग वाऱ्याच्या लहरींवरून त्याच दिशेनें तरंगत जात असल्यामुळें वाऱ्याच्या विरुद्ध दिशेनें मादी-पतंग सुगंधी कण तिकडे पाठवीत असणें अशक्य आहे. Duane आणि Tyler या शास्त्रज्ञांनीं परा-रक्त ( infra-red ) किरणांच्या लहरींवरून पतंग-माद्या नर पतंगांना प्रेमसंदेश पाठवितात कीं काय तें पाहावयासाठीं प्रयोग करून पाहतां त्यांना असें दिसलें कीं, मादीच्या शरीरांतील कांहीं नैसर्गिक रसायनांमुळें तिला किरणोत्सर्जन किंवा प्रकाशविकिरण (radiation) करतां येत असल्यामुळें या परा-रक्त किरणांच्या वातावरणांत ती गुप्त भाषेंत किंवा खुणांनीं हा संदेश पाठवूं शकते. ही गुप्त पल्लवी म्हणजेच तिचा प्रीतिसंदेश होय.

नर-पतंगाला तो संदेश कळतो कसा? पतंगाच्या डोळ्यांवर स्पर्शसंवेदना ग्रहण करणारा केसाळ तुरा

( antennae ) असतो, त्याच्या योगें तो हा संदेश ग्रहण करतो. या केसांची लांबी ४ मायक्रोन किंवा त्यांच्या गुणाकाराएवढी ( ·००१५६ ते ·००३१२ इंच ) असते. मादीच्या शरीरांतून दूरध्वनिक्षेपित होणाऱ्या संदेशांच्या कटिबंधा (emission band) ला पुरेशी ती लांबी असते. टायलर म्हणतो : " नर-पतंगाच्या डोक्यावर संदेश ग्रहण करायला तयार ठेवलेला ( tuned ) संवेदनाग्राहक केशकलाप (antennae array) असतो व मादी-पतंगाचा शोध करायला लागणारें त्याचें संदेशग्राहक साधन हेंच असतें. " ( " टाइम. " २५ सप्टें. )

( २ ) नराचें मादीला आमिष—ज्यांचें प्रणयाराधन दिवसां चालतें अशा बहुतेक प्राण्यांत दृष्टीला फार महत्त्व आहे. वागणुकीच्या ढंगाला विशेष महत्त्व नाहीं. कांहीं पक्षी भेटीदाखल वस्तु देऊन मादीला अनुकूल करून घेतात. त्यांचें प्रियाराधन बराच काळ चालतें. एका प्रकारचे काळ्या डोक्याचे हेरॉन पाणपक्षी आपल्या मादीला काड्याकुटक्यांचा अहेर करतात. कॉमन टर्न नर आपल्या मादीला दाखविण्यासाठीं चोंचींत लहानसा मासा आडवा धरतो, आणि किनाऱ्यावर येरझारा घालतो. या प्राण्यांतील लिंगभेद माणसाला डोळ्यांनीं दिसणें फार कठिण असतें. पण जेव्हां दुसरा पक्षी येऊन तो मासा स्वीकारतो तेव्हां पक्ष्यांचें अवलोकन करणाऱ्यांना समजतें कीं त्या पहिल्या पक्ष्याला आपली प्रियकरीण लाभली आहे. तो मग तिच्यापुढें वांकतो व वाळू उकरतो, आणि सहकार्याची खूण ती करते कीं काय तें पाहतो. त्याची मागणी स्वीकारली गेल्यास प्रणयोपभोगानंतर तो वाळूंत खड्डा तयार करूं लागतो व तेथें मादी आपलें घरटें बनविते.

लहानग्या मॅक्रोपेझिड जातीच्या माशीचें प्रियाराधन असेंच असतें: मॅक्रोपेझिड नर आपलें निळसर चमकदार अंग दाखवीत पानांवर बसतात व तोंडांतून कांहीं रसायनांचे बुडबुडे काढतात. हे बुडबुडे खाण्यायोग्य असतात. मादी जर प्रतिकूल नसेल तर ती चटकन् येऊन ते बुडबुडे टिपूं लागते आणि तो आहार मिळेपर्यंत नरानें सारखा सुखोपभोग घेतला तरी ती नाकारीत नाहीं, पण ते बुडबुडे संपले कीं प्रेम खलास !

एम्पिडिड जातीच्या माशीच्या प्रणयचेष्टा याहून गुंतागुंतीच्या असतात. नर एम्पिडिड अगदीं लहान कीटकांना पकडतो आणि त्यांच्या शरीरांतील रस शोषून घेतो. कांहीं वेळां नर त्या कीटकाला फक्त संवेदनाशक्तिहीन करतो. मग तो माद्यांच्या घोळक्यांशीं येऊन आपली प्रिया निवडतो व तिला ती भेट देतो. त्या कीटकाच्या अंगांतून रस मिळत असेपर्यंत मादी नराला वश असते, पण रस संपला कीं कीटकाचें निष्प्राण शरीर व तो प्रियकर नर या दोघांनाहि ती तुसत्या कटाक्षानें त्याग करते.

' हिलेरा ' ( hilara ) नामक माशीच्या कांहीं जातींत हा प्रियाराधनाचा विधि याहून विशेष असतो. नर ' हिलेरा ' उडत उडत आपल्या तोंडांतून चिमुकल्या गोल विमानांसारखे फुगे फुगवीत जातो. हे फुगे तो मादीला भेट देतो आणि ती त्यांच्याशीं खेळत त्यांची पाहणी करीत असतांना नराला शरीरोपभोग घेऊं देते. ही फुग्यांचीं विमानें आडगिऱ्हाइकींहि चालतात. दुसऱ्या कोणा जोडप्यानें उपभोगानंतर टाकलेले फुगेहि हे नर उचलतात आणि पुन्हां भेटीदाखल उपयोगाला आणतात.

( ३ ) ' एका कोळियानें ':—आपल्या भिंतीवर किंवा कुंपणावर जाळीं विणून भक्ष्य पकडणारे कोळी किती तरी जातीचे आहेत. या प्राण्यांत मादी आपल्या नराला नियमानें खाऊन टाकते अशी समजूत आहे. पण या प्राण्यांविषयीं संशोधन केलेले सर्वश्रेष्ठ अधिकारी, Yale विद्यापीठाचे अलेक्झांडर पेट्रुन्केविच, म्हणतात कीं ही समजूत बरीचशी निराधार आहे— ' This is far from true'. कोळ्याच्या मादीला पोटभर खावयाला मिळालेलें असेल तर तिच्याशीं रतिक्रीडा करणें नराला अगदीं सुरक्षितपणाचें असतें; पण क्वचित् अशाहि स्थितींत ती नराला गिळून टाकते. आपली मादी हेरल्यावर नर कोळी जो चतुर नाच करीत आजूबाजूला फिरतो त्याचें कारण मादीची इच्छा कळून घेण्यापेक्षांहि तिला भरपूर आहार मिळालेला आहे कीं नाहीं हें समजून घेणें हें असतें. या नाचानें












प्रत्युत्तर मादीनें एखाद्या माशीला पकडावें तशा हालचालीनें दिलें तर नर बापडा तिच्या वाटेस जात नाहीं. ऑर्ब वीव्हर म्हणून ओळखल्या जाणाऱ्या विणकर कोळ्याच्या जातींत नर मादीच्या जाळ्याच्या बाजूला जातो व तें हळूंच हलवितो. ती भुकेली असेल तर ती भक्ष्य पकडण्यासाठीं म्हणून तुटून पडेल आणि मग नर तिच्या मार्गांत येणार नाहीं; ती जर आहरलेली असेल तर नराला जवळ येऊं देईल. कित्येक प्रसंगीं हें जोडपें सबंध हंगामांत एकाच जाळ्यांत राहतें आणि यामधून जे नर वांचतात ते भक्ष्याच्या शोधांत मादी असतांना तिच्या वाटेला जात नसल्यामुळेंच टिकून राहतात.

लांडगा-कोळी म्हणून जी कोळ्यांची जात आहे त्यांतील नराला जवळपास असलेल्या मादीचा वासहि कामोद्दीपनाला पुरतो. मग तो मादीसाठीं भक्ष्य शोधण्याच्या खटपटीस लागतो. कोळ्यांचें निरीक्षण करणाऱ्या अधिकारी तज्ज्ञांनीं अनेक वेळां रिक्त हस्तानें जवळ आलेल्या प्रेमिकाचा मादीनें केलेला स्वाहाकार पाहिला आहे. भुकेल्या मादीला पकडलेली माशी देऊन उपभोग घेणें व मग तिच्या तावडींतून निसटणें ह्या दोन्ही गोष्टी मोठ्या चातुर्याच्या असतात. एकदां तर एका नर कोळ्यानें स्वतःच रक्त शोषून उरलेल्या शुष्क माशीचाच आहेर मादीला केल्याची गोष्टहि अधिकृतपणें नमूद आहे.

पश्चिमेकडील ( अमेरिकेंतील ) वाळवंटांतील केसाळ जातीच्या कोळ्यांची दृष्टि फार कमकुवत असते, किंवा रात्रीं हालचाल करण्याची संवय त्यांना कमी असते. अशा स्थितींत नर-मादी एकत्र आल्यावरहि त्यांचा संबंध सहज तुटतो. ज्या पायाच्या स्पर्शामुळें त्याला मादीचें अस्तित्व कळतें तो पाय जरा बाजूला सरला व तो नर इंचाहूनहि कमीच बाजूला गेला तर त्यांना पुन्हां जवळ येतां येत नाहीं. या व यासारख्याच इतर जातीच्या कोळ्यांतील नर आपल्या भोगेच्छु मादीला गिळण्यापूर्वीं आपल्या पुढल्या पायाचे कांटेरी तळपाय तिच्या विषारी जबड्यावर घट्ट बसवितात, म्हणजे मग तिला जबडा उघडतां येत नाहीं. पण कामशांतीनंतर जबड्यावरून तळपाय काढून कोळ्यानें आपली सुटका करून घेणें मोठें कौशल्याचें काम असते.

( ४ ) खद्योताचें प्रेमजीवन:--सर्व प्राणिमात्रांत रात्रीं अंधारांतहि नजरेच्या साहाय्यानें प्रणयाराधन करण्याची शारीरिक सोय कोणा प्राण्यांत असेल तर ती चमकदार काजव्यांत होय. Firefly काजवे व Glowworm काजवे हे बाह्य दृष्टीनें किंचित् भिन्न वाटले तरी शारीरिक रचनेच्या बाबत सारखेच असतात. गवतांच्या पात्यांवर सरकत सरकत हे प्राणी आपल्या शरीरांतून प्रकाश चमकवीत राहतात. हा प्रकाश त्यांचा प्रणयसंदेश असतो. त्याला दुरून मादी प्रत्युत्तर देते. अशा तऱ्हेनें त्यांची एकमेकांना जाणीव होते.

फॉटिनुस पायरेलिस जातीच्या ' फायर-फ्लाय ' काजव्याविषयीं बरेंच संशोधन झालेलें आहे. नराची चमक जास्त असते. मादीची कमी असते पण ती अधिक काळ टिकते. पण या चमकींतील कमी-जास्तपणापेक्षांहि परस्परांच्या संदेशांतील कालाचें अंतरच खरें महत्त्वाचें असतें. नराची चमकखूण दिसल्यावर बरोबर दोन सेकंदांनीं मादी आपली प्रत्युत्तराची चमक झगझगविते. खूण पटतांच नर आपलें तोंड तिच्याकडे वळवितो व पुन्हां खूण करतो. बरोबर दोन सेकंदांनीं पुन्हां प्रत्युत्तर मिळालें म्हणजे त्याची दिलजमाई झाली असें समजावें. अशी दहापंधरा वेळां देवघेव केली म्हणजे नराला मादीची जागा सांपडते. या काजव्यांची ही रीत म्हणजे कीटकांतील संदेशवाहनाचें व उड्डयनाचें अत्यंत सुंदर उदाहरण आहे ( A beautiful example of insect navigation). कृत्रिम तऱ्हेनें प्रयोग करून असें सिद्ध झालें आहे कीं, या काजव्यांच्या चमकण्यांतील प्रकाशाच्या धर्मापेक्षांहि त्यांच्या उत्तर-प्रत्युत्तरांतील कालाचें--दोन सेकन्दांचें--अंतर हेंच खरें निर्णायक असतें.

साहित्यांतील प्रसिद्ध खद्योत ( Glowworm)- ( Shine: little glowworm, glimmer, glimmer )--म्हणजे ' लॅम्पीरिस नॉक्टिक्यूला ' जातीच्या खद्योतांच्या पंखहीन माद्या होत. या जातींतील नरांना मोठे डोळे असतात, पण उजेडाची चमक दाखविण्याचें सामर्थ्य नसतें. माद्या अळी-



अनुक्रमणिका








सारख्या असतात, पण त्यांची चमक दाखविण्याची शक्ति खूप असते. मादी उंच जागीं गवताच्या पातीवर बसते व सारखी प्रकाशाची उघडझांप करीत राहते; बरेच वेळां नर जवळ येईपर्यंत ती हा प्रकाश सारखा दाखवीत राहते. त्या मादीचें वर्तन म्हणजे मादीहि प्रियाराधन कसें करूं शकते याचें निसर्गातील निर्विवाद उदाहरण आहे. स्त्रीजातीला उपलक्षून जो लाजरेपणाचा किंवा गोपनाचा आरोप केला जातो, तो या खद्योत-मादीला यत्किंचित् लागू नसतो. ती धीटपणानें आपल्या नराला आमंत्रण देत असते.

( ५ ) 'पॅलॅरोप' पक्ष्यांचें णयजीवनः—अत्यंत उत्तरेच्या प्रदेशांत आढळणाऱ्या palarope पक्ष्यांच्या माद्याहि अशाच नराला मोहून टाकीत असतात. हे पक्षी ऋतुमानाप्रमाणें अमेरिकेकडे स्थलांतर करीत असतांना त्यांचें प्रियाराधन चालतें. पॅलरोप मादीचें अंग अधिक चमकदार रंगांनीं सुशोभित असतें. आपले अंगविक्षेप नरापुढें करीत ती त्याला वश करून घेते. गंमत अशी कीं मादीनें घरट्यांत अंडीं घातल्यावर हा बापच तीं उबवितो व पिलांना वाढवितो; मादी-आई मात्र बाहेरख्याल करीत भटकते—' The mother disports herself abroad. '

—[ " सायन्टिफिक अमेरिकन् " जुलै, ५० वरून ]

---

## शॉचें ऋण

शॉनें मला सोशॅलिस्ट केलें यांत विशेष नाहीं. विशेष हें कीं, त्यानें माझ्या मनांत सामाजिक अन्यायाविषयीं चीड उत्पन्न केली. सुखवस्तू, ऐदी, महाशिष्ट आणि घमेंडखोर लोकांच्याबद्दल माझ्या मनांत डोळस तिरस्कार उत्पन्न करून त्यानें माझ्या अर्धवट आर्थिक ध्येयवादाला भरीव आकार आणून दिला.

—सी. ई. एम्. जोड

---

# चुकीची दुरुस्ती

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे नोव्हेंबर १९५० च्या अंकांत, पान ५२ वर श्री. बा. ग. जगताप यांच्या लेखांत उजव्या बाजूच्या रकान्यांत वरून सातव्या ओळींत पुढील वाक्य आहे : ' मुसलमानांकरितां अलीगड येथें व हिंदूंकरितां बनारस येथें कॉलेजें स्थापन झालीं '. त्या वाक्यांत 'अलीगड येथें' हे शब्द चुकीचे असून त्या ऐवजीं ' कलकत्ता येथें ' असे शब्द पाहिजेत. श्री. बा. ग. जगताप यांच्या मूळ हस्तलिखितांत शब्द मूळ बरोबर होते. परंतु संपादकीय गैरसमजामुळें ' अलीगड येथें ' असें चुकीनें छापलें गेलें याबद्दल खेद वाटतो. १९१७ व १९२० सालीं स्थापन झालेल्या, अनुक्रमें बनारस येथील हिंदु विश्वविद्यालय व अलीगड येथील मुस्लिम विश्वविद्यालय, ह्या संस्था वरील वाक्यांत अभिप्रेत नसून, १७८१ सालीं वॉरन हेस्टिंगज् यांनीं अरेबिक व पर्शिअन भाषांच्या शिक्षणासाठीं कलकत्त्यास काढलेला मद्रसा व १७९१ सालीं जोनाथन डंकन यांनीं बनारस येथें संस्कृतच्या शिक्षणासाठीं उघडलेलें महाविद्यालय या संस्था वरील वाक्यांत लेखकास अभिप्रेत आहेत.

—कार्यकारी संपादक









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष